


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका





# दीपावली

साहित्य-कला-सङ्गम

ऑक्टोबर : १९६४ वर्ष २० वें मूल्य १ रु.

## श्रेयनामावलि —




दलाल आर्ट स्टुडिओ : ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

टे. नं. ७७७६५

Gram : Dalalart

* संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक-श्री. दीनानाथ दलाल, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किमत १ रु.+ रजि. पोस्ट ५५ न. पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें हीं चालकांचींहि अविकृत मतें असतातच असें नाहीं.




• Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57

अनुक्रमणिका




## दलाल आर्ट स्टुडिओ

४२, केनडी ब्रीज, मुंबई ४

टेलिफोन : ७७७६५ ★ तारेचा पत्ता : DALALART


● **वर्गणीदारांस सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशीं वार्षिक वर्गणी रु. १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होतां येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यं शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाइकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिनाभरांत सामान्यत: कळविला जातो. **पोस्टेज असलेलें** नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसें पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.


संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ** दलाल यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमि भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनडी ब्रीज, मंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.


### काळ पुरुषावर विजय मिळविण्यासाठीं

# “सी मो ल्लं घ न”

**‘तुतारी’** फुंकिली गेली आहे. रणशिंगें वाजत आहेत. ढोल डिंडिम निनादत आहेत. समराच्या हांका गरजत आहेत. नवें, तेजस्वी, पराक्रमी इतिहासाचें पान आवाहन करीत आहे. नव्या शक्ति, बुद्धीला नवीन कार्यक्षेत्रें उपलब्ध करून दिली आहेत – काळानें ! काळपुरुष वारंवार दारें खडखडावून गेला. तो आला तेव्हां त्याला वारंवार वाटत होते कीं, ह्या खंडप्राय घरांत राहणारी’ माणसें दार उघडतील. आपलें आशेनें, उमेदीनें आनंदानें स्वागत करतील. पण त्याला दार कधीं उघडलेंच गेलें नाहीं. त्याच्या आशांना कधीं फळें आलींच नाहींत. त्याचें मन कधीं मोहरून गेलेंच नाहीं. त्याच्या मनांत कधीं तेजस्वितेचा जयजयकार गरजलाच नाहीं ! त्यानें दार वाजविलें कीं, कांहींतरी जाग आल्यासारखें आंत घडे. कांहीं धडपडही दिसे. कांहीं भांडीं वाजल्याचा आवाजही त्याला ऐकूं येई. कांहीं वेळां वादळेंही झाल्यासारखा भास त्याला होई. पण आतां दार उघडेल मग दार उघडेल म्हणून दारापाशीं वाट पहात उभा राहिलेला काळपुरुष तसाच परत गेला. पण आम्ही दार उघडलें नाहीं. त्याच्या समोर गेलों नाहीं. त्याचें आवाहन कधीं ऐकलें नाहीं—आव्हानाला कधीं उत्तर दिलें नाहीं. उलट आव्हानाला उत्तर न देणें हेंच कसें हिताचें आहे. कल्याणाचें आहे याची नुसती चर्चा करीत राहिलों. त्यापलिकडे कधीं आमची झेंपच गेली नाहीं! आणि अखेर काळपुरुष खालच्या मानेनें परत गेला. आमचें तेजस्वी रूप कधीं त्याला दिसलेंच नाहीं ! विजयाची कांक्षा बाळगणारा तेजस्वी हुंकार इथें त्याला ऐकूंच आला नाहीं. समराच्या नांवानें येथें एकात्मतेचें दर्शन घडेल. आक्रमकाचें आक्रमण मोडून निघेल. असुर शक्ति ह्या ‘सुरांच्या’ भूमींतून पराभूत होऊन नाक कान गमावून रक्ताळलेल्या अवस्थेंत परत जाईल असा विश्वास त्याला वाटत होता— नव्हे त्याची खात्री होती ! पण सुरांची शक्ति एकवटलीच नाहीं. आकाशांत उडाला फक्त धुराळा ! कांहीं घडलेंही ! पण अदम्य अशा विजयाची कांक्षा फुललीच नाहीं ! अजूनही पूर्वजांच्या “अटके” चेच विचार आम्ही करीत बसलों आहोंत. **“नियमन मनुजासाठीं । मानव नसे नियमनासाठीं जाणा”** हा गेल्या शतकांत सांगितला गेलेला विचार जणुं आम्ही ऐकलाच नाहीं. **“अटक कशाची बसलां घालुनि ?”** हा त्या कवीनें—द्रष्टयानें केलेला प्रश्न जणुं आम्हांला समजलाच नाहीं ! **“पूर्वी पासुनि अजुनि सुरासुर। तुंबुळ संग्रामाला करिती । संप्रति दानव फार माजती। देवांवर झेंडा मिरविती। देवांच्या मदतीस चला तर !** हें सांगणारी त्याची ‘तुतारी’ जणुं आमच्या कानांवर आलीच नाहीं ! अखेर आम्ही होतों तिथेंच आहोंत आणि असुरांचेही दळ होते तिथेंच आहे. पसरते आहे. आपल्या असुरी लीला करीत आहे. कधीं त्याची भुतावळ गोव्यांत उभी राहते. तर कधीं औरंगाबाद, मालेगांवला. कधीं तिला काश्मीर मानवतो तर कधीं दिल्लीला ती सोज्वळ नांव घेऊन, पांढरे कपडे घालून संचार करून जाते. पण अजूनही अमर्यादाचें आवाहन आम्हांला मिळतच नाहीं ! अजूनही चांगल्या कल्पना इथें हास्यास्पदच ठरतात. समर गीतांतलीं ‘गीतं’ फक्त राहतात. “समर” कधींच इथें ‘जागृती’चें कार्य करीत नाहीं. “रणांत विजय मिळवूनच परत येईन” हें आईला सांगून रणावर निघून जाणारा संजय पुन्हां इथें अवतरेल काय ? ‘असुराला मारूनच परत येईन’ अशी मनोमन कांक्षा धरून प्रतापगडावर गेलेले व वाघनखांची किमया करून परतलेले शिवराय पुन्हां अवतरतील काय ? विजयादशमीचा सण साजरा करतांना ही विजयाची परंपरा आम्हांला आठवेल काय? कोणतीहि मोठी भावना आधीं मनांत फुलावी—वहरावी लागते ! पण

## अटकेपार झेंडा

संपादक, दीपावली

स. न. वि. वि.

जर्मनींत ऱ्हाईन नदीच्या कांठीं झाडां-खालीं "दीपावली" वाचीत पडण्याची कल्पना आपणांस कशी काय वाटते ? पण ती कल्पना नसून सत्य घटना आहे.

माझा भाऊ मॉस्को येथें दीपावलीचा वर्गणीदार आहे. तो व मी मिळून जर्मनी व फ्रान्सचा कांहीं भाग पाहिला. (एक जण सायकलवर व एक जण हिच हायकर) तेव्हां येतांना तो दीपावलीचे कांहीं अंक घेऊन आला होता. ते मी आवाशीपणानें वाचून काढले. ऱ्हाईन नदीच्या किनाऱ्यानें सायकल चालवून थकवा आला कीं एकादा अंक घेऊन सांवलींत वाचीत पडावयाचें.

माझ्या ऱ्हाईन खोऱ्याच्या प्रवासाच्या शेवटच्या जागीं माझा मित्र राहतो. तेथें जाईपर्यंत मासिकांचा फन्ना उडविला. माझ्या मित्राची त्यावर नजर जाताच त्यानें सर्व मासिकें काढून घेतली. प्रवासांत अनेक गंमतीदार अनुभव आले पण दीपावली वाचनाची गंमत न्यारीच !

मॉस्कोंतही सर्व महाराष्ट्रीयन दीपावलीवर टपलेले असतात. आपल्या दिवाळी अंकांतील चित्रें तर कांहीं रशियनांना येवढी आवडली कीं त्यांनीं एकेका चित्राच्या बदल्यांत एकेका चित्रास चांगल्यापैकीं फ्रेम बसवून दिली असे माझा भाऊ सांगतो. दिवाळी अंक तर मॉस्कोतील वाचकांनीं गडपच केला.

दीपावलीस शुभचिंतन !

आपला,

**दिनकर द. वर्वे**

बी. ई. (एम्.),

बी. टेक्स्ट (इंजि.)

टूर्नाइ (बेल्जम)

---

त्यासाठीं मनाला घालून घेतलेली 'अटक' उडवून दिली पाहिजे. असीमाच्या स्वागतासाठीं 'सीमोल्लंघन' केलें पाहिजे. काळपुरुषावर विजय मिळविण्यासाठीं आधीं स्वतःच्या राष्ट्रीय दुर्गुणांवर विजय मिळविला पाहिजे. काळाचें आवाहन विजयाचें आहे. आव्हान तेजस्वितेचें आहे. महत्तमत्तेचें आहे. पण त्यासाठीं "अटक" ओलांडली पाहिजे.

—संपादक




## पानन् पान वाचनीय

संपादक, दीपावली

स. न. वि. वि.

आपल्या अंकाचा मी नियमित वाचक आहे. आपला सप्टेंबरचा अंक वाचला. त्यांतील साहित्य वाचून तृप्त झालों. पानन् पान वाचनीय आहे. त्याबद्दल आपले व लेखकांचे हार्दिक अभिनंदन ! एक दोष आपल्या निदर्शनास आणूं इच्छितों. (तो दोष असावा असं वाटतं म्हणून) पृष्ठ क्र. ५५ वर भाव्यांच्या तोंडी— "There is a difference between a good play & a great play." "Good play" लिहिणें सोपे नसलें तरी शक्य आहे. पण Good play लिहिणें ही गोष्ट तर फारच कठीण आहे." 'Good play लिहिणें ही गोष्ट तर फारच कठीण आहे' असं भाव्यांचं वाक्य नसावं. Great play लिहिणं ही गोष्ट तर फारच कठीण आहे, असं त्यांना म्हणायचं असावं. कदाचित हा मु. रा. वि ही असेल ! जें प्रसिद्ध झालं तेंच भावे बोलले असा आपला अट्टाहास असेल तर ती द्विरुक्ती नव्हे काय ?

कृपया खुलासा व्हावा.

त्रासाबद्दल क्षमस्व. आपला,

**प्रताप संसारे,** दादर

(पु. मा. भावे यांना "Great play" असेंच म्हणावयाचें आहे. मुद्रण दोषामुळें ते "Good play" असें पडलें आहे. साक्षेपी रसग्रहणाबद्दल धन्यवाद.)

## लेखमालेचें पुस्तक हवें !

संपादक, दीपावली.

स. न. वि. वि.

आपला दिपावलीचा दर महिन्याचा अंक आम्ही नियमितपणें वाचतों. अंक दर्जेदार असल्यामुळें तो वाचून मनाचें समाधान होतें. गेल्या वर्षी याच अंकांत 'हा जय नांवाचा इतिहास आहे' या शीर्षकाखालीं जी लेखमाला आत्माराम नीलकंठ या लेखकाच्या नांवानें प्रसिद्ध झाली होती ती पुस्तकरूपानें प्रसिद्ध होईल अशी आम्हांला आशा वाटत होती. पण अजूनही ती प्रसिद्ध झाली नाहीं. ती सर्व लेखमाला वाचून संग्रहीं असावी अशी आमची तीव्र इच्छा आहे तरी ती प्रसिद्ध होणार नसल्यास जर त्या लेखमालेचे सर्व अंक आम्हांला पाठविल्यास आम्ही आपले आभारी होऊं. अंकाची किंमत आपण उत्तर पाठविल्यावर तावडतोब मनिऑर्डरनें पाठवून देऊं. तसेंच आत्माराम 'नीलकंठ' या टोपण नांवानें लिहिणाऱ्या लेखकाचें नांव जाणून घेण्यास आम्ही फार उत्सुक आहोंत तरी तेंही कळविणाची कृपा करावी.

आपले वाचक,

**कल्याण पांडुरंग मुश्रीफ,** डोंबिवली

| | |
|---|---|
| चन्द्रकान्त पाटील | विजय ग. राऊत. |
| श्री. धों. वालावलकर | प्र. न. वैद्य. |
| बा. य. मुळे. | शरद दुर्वे. |
| ग. वा. आयरे. | वि. म. डवळे. |
| नि. स. सामंत. | म. श्री. काळे. |
| विजय गुप्ते. | ग. मो. पुरी. |
| मधुकर ठेंगडी. | अ. स. त्रावकर |

(ही लेखमाला पुस्तकरूपानें लवकरच प्रसिद्ध होणार आहे हें कळविण्यास आम्हांस आनंद वाटतो. लेखकाचें नांव जाहीर करणें संपादकीय धोरणांत बसत नसल्यानें केवळ अशक्य आहे.)













: २ :

## अरविंद गोखले म्हणतात—

# "लेखक जन्मावाच लागतो. आणि आपलं साहित्य अमर करण्यासाठीं त्याला वारंवार जनन मरणाचा

**गोखल्यांच्या** वद्दल खूप ऐकलं होतं. वाचलं होतं: ते अवोल आहेत. संकोची आहेत. सभासंमेलनाला ते सहसा जात येत नाहींत. व्याख्यानांचीं आमंत्रणें ते टाळतात – वगैरे वगैरे ! पण ऐकणें, पाहणें आणि अनुभव घेणें यांत खूप अंतर आहे, ह्याचा मी गोखल्यांना प्रथम भेटलों तेव्हां प्रत्यय आला. गोखल्यांकडे मी प्रथम गेलों तो त्यांच्या कार्यालयांत ! पुण्याच्या शेतकी कॉलेजमधील प्राध्यापकी त्यांनीं वीस वर्षे केली, आणि पुण्यांत निर्माण केलेलें स्वत:चें विश्व तेथेंच ठेऊन गोखले आतां मुंवईस नोकरीनिमित्त आले आहेत.

गोखल्यांना आल्हादक व्यक्तित्व लाभलें आहे ह्याची जाणीव मी १९४८ सालीं त्यांचा प्रथम फोटो पाहिला तेव्हांच झाली होती. वस्तुत: आज गोखले पंचेचाळीसच्या घरांत आहेत. पण आजही गोखले तेवढे आहेत असें वाटत नाहींत. प्रसन्न व्यक्तित्व, हंसरा चेहरा, त्या हास्यांतून व्यक्त होणारे मुग्ध भाव, मनमोकळा स्वभाव, खूप वाचणं आणि खूप वोलणं हें गोखल्यांच्या सहवासांत मला जाणवलेले त्यांचे विशेष ! मला गोखले अवोल वाटले नाहींत. त्यांचा माझा परिचय जणुं गेल्या आठ दहा वर्षांचा आहे असं वाटावं अशा मनमोकळेपणानें ते वोलले. अनुभवांच्या इतक्या विविध स्तरांतून त्यांनीं मला फिरवलं कीं, मी थक्क झालों. उघडया डोळयांनीं आणि मोकळ्या मनानें गोखल्यांनीं जग पाहिलं आहे, वैयक्तिक जीवनांत पुणें, मुंवई, दिल्ली, अमेरिका याठिकाणीं गोखले शिकले – राहिले. दिल्लीला असतांना त्यांनीं १९४२ च्या चळवळीच्या वेळीं एस्. एम्. जोशी, अरुणावाईंच्या प्रेरणेनें एक भूमिगत रेडियोकेंद्रही चालविले. ते क्रिकेटही खेळले. वक्तृत्वाचीं वक्षिसेंही त्यांनीं संपादन केली. नाटकांत कामें केली. आज गोखले मुंवईकर झाले असले तरी त्याचें लक्ष सारें पुण्यांतच आहे. दहा माणसांतेला व दहा माणसांत रमणारा असा हा माणूस आहे. मुलांचें गोखल्यांना फार वेड आहे. मुलांचा भोंवतीं जर खेळ चालला असेल तर हातांतलें पेन टाकून गोखले त्यांच्यावरोवर खेळायला जातील. क्रिकेट कॉमेंट्री जर चालूं असेल तर गोखल्यांचें लेखन थांवेल. त्यांना पेटस् (कुत्रा, मांजर वगैरे) चें मात्र अजिवात आकर्षण नाहीं. गोखले अमेरिकेंत गेले, राहिले. तिथल्या कितीतरी गंमती त्यांनीं मला सांगितल्या. उघडया डोळयांनीं आणि अनुभव घेण्याच्या जिद्दीनें गोखल्यांनीं जग पाहिलें आहे. अमेरिकाही पाहतांना त्यांच्यातला लेखक जागृत होता आणि मुंवईतली वेश्यांची वस्ती पाहतांनाही त्यांनीं नाक मुरडलें नाहीं. अनुभवाला धाडसाची जोड लागते. गोखल्यांच्या जवळ हें धाडस भरपूर आहे. त्यांनीं अनेक स्तरांतील जे थरारक अनुभव मोकळेपणानें सांगितलें त्यावरुन त्यांच्या धाडसी वृत्तीचें मला फार कौतुक वाटलें. अनुभवांनाही किंमत असते. ती चुकवून अनुभव विकत घेतां येतात. अमेरिकेंत जाऊनही गोखले संपूर्णपणें भारतीय राहिले आहेत मूल्यांवरचीं त्यांची श्रद्धा त्यांच्या वागण्या-वोलण्यांतही जाणवते. त्यांना जसें गप्पांचें वेड आहे तसेंच भटकण्याचेंही ! दिलखुलास वोलणारे गोखले गप्पांच्या ओघांत रंगून जातात आणि हंसतातही दिलखुलासपणें ! अंतर नाहींसें करण्याची एक फार मोठी शक्ति त्यांच्या स्वभावांत आहे असें मला जाणवलें. आज इतक्या वर्षांनीं गोखले एका कॉलेजच्या होस्टेलमध्यें तात्पुरते राहतात. खोलींत होस्टेलचेंच वातावरण ! दोन टेवलें, दोन कॉटस्, दोन रॅक्स–दोन खुर्च्या ! भोंवतीं वंगले आहेत. पण त्या वंगल्यांतून वा रस्त्यांतून 'मुंवईची वर्दळ' दिसत नाहीं. टेवलावर 'कॅपस्टन'चें पाकीट असलें तरी गोखले पट्टीचे अग्निहोत्री नाहींत. Encounter सारख्या नामवंत मासिकाच्या स्पर्धेंत वक्षीस मिळवून जागतिक विक्रम करणारे गोखले शांत व संयत शब्दांत वोलत होते आणि मी——

**मुलाखत : प्रभाकर अत्रे**

प्रश्न – शाळेंतल्या हस्तलिखित मासिकांत आपण पहिली कथा, चुटके, कादंवरीचें एक प्रकरण वगैरे भाग लिहिलांत असें आपण एकदोन ठिकाणीं लिहून ठेवलं आहे (मनोहर–सत्यकथा) आपण ह्या विविध प्रकारच्या लेखनाकडे एकदम कसे वळलांत ? कांहीं पूर्व संस्कार असतीलच कीं !

गोखले ––पूर्व संस्कार होतेच ! माझ्या आजोवांची व वडिलांची आणि हरीभाऊ आपटयांची मैत्री होती. त्यामुळें आमच्या घरीं करमणूक मनोरंजन, रत्नाकर, यशवंत मासिकांचे सर्व अंक होते. घरीं पुस्तकें भरपूर ! कवि श्री. वा. रानडे हे माझे मामा ! त्यामुळें यशवंत, गिरीश, घाटे, माधव ज्युलियन वगैरे कवि लहानपणींच परिचित

# सोहळा भोगावा लागतो-’



## अरविंद विष्णु गोखले

झाले. माझ्या आईला वाचनाचें फार वेड. तशी ती फार शिकली नाहीं. पण साहित्याची तिला अतोनात गोडी. आमचे घर सुधारकांचे व सुशिक्षितांचे. शाळेंत मॅट्रिकच्या वर्षी वक्तृत्व स्पर्धेंत मला पहिलें बक्षीस दत्तो वामन पोतदार हे अध्यक्ष असतांना मिळालें. पण मॅट्रिकनंतर बी. ए. ला जाणें ही कल्पनाच घरांत रुजली नाहीं. लेखन कामादीबद्दल अवंती भंवती घृणा होती.

प्रश्न — मग अशा परिस्थितींतही तुम्ही लेखनाचें कार्य चालूं ठेवूं शकलांत?

गोखले—मोकळेपणानें मला लिहितां येत नव्हते. चोरून, लपून, छपून मला लिहावें लागे. घरीं लेखन दाखविण्याची सोय नव्हती. कारण आपल्या पैकीं कुणीतरी लिहितो ही कल्पनाच मुळीं न पटण्यासारखी होती. १९३६ सालीं मनोहरकडून सहा रुपये सहा आण्यांची मनिऑर्डर आली. परंतु वडिलांनीं ती म. ऑ. परत केली. साहित्य लिहिणं आणि त्यांतहि पैसे घेऊन लिहिणं ह्या दोन्ही कल्पना मान्य होण्यासारख्या नव्हत्या. त्यामुळें मला फार दिव्यांतून जावें लागलें.

प्रश्न —तुमची ती पहिली कादंबरी आतां आठवते का ? ती सुचली कशी ?

गोखले— आमच्या शाळेंतल्या हस्तलिखित मासिकाचा मीच संपादक होतों. मजकुरांत विविधता हवी म्हणून मग चुटके, कथा व एक कादंबरीचें प्रकरण लिहिलें. मोतीलाल नेहरूंवर एक कविताही लिहिली. आतां त्यांत कांहीं स्वारस्य होतें असें वाटत नाहीं. त्या कादंबरीचें कथानकही आतां मला आठवत नाहीं. नाथ माधवांचें अनुकरण करून कांहींतरी पानें भरडून काढली होती झालं !

प्रश्न — नंतर मग कथा लेखनाकडे कसे वळलांत ?

गोखले— खरं म्हणजे मला क्रिकेटपटु व्हायचं होतं. वक्तृत्वांतही खूप पराक्रम करून दाखवावा असंही वाटत होतं. नाटकांतही मी कामं केली. पण ह्या सर्व ठिकाणीं प्रथम श्रेणी मिळाली तरच ती मला हवी होती. आणि तें अवघड होतं. दुसरा क्रमांक घेणं हें बालपणापासूनच्या माझ्या जिद्दी स्वभावांत बसत नव्हतं. वाङमयीन क्षेत्रांतच हें यश मिळवितां येईल असा विश्वास मात्र लिहिण्याआधींच वाटला आणि मग मी लेखनाकडे वळलों. खरं साहित्य लिहिलं जायचंय् असं मला वाटायचं. जीवनांत दिसतं तें तेव्हां साहित्यांत आढळत नव्हतं. नि तें आपण आणलं पाहिजे. आणूं शकूं असं मला प्रथमपासून वाटत असे. तशाच माझ्या एकलकोंड्या आणि त्याच बरोबर धाडसामागें धावणाऱ्या वृत्तीला लेखनाचं माध्यम अनुकूल होतं. तरीही अजून वेस्ट इंडीज, ऑस्ट्रेलियाचीं क्रिकेट मॅच असली अगर भोंवतीं लहान मुलं वागडत असलीं अगर एखादं चांगलं गाणं किंवा नाटक असलं तर मला








त्या काळांत लेखन करणं अशक्य होतं.

प्रश्न — तुमच्या घरच्या ह्या वातावरणाचा तुमच्या लेखनावर कांहीं परिणाम झाला असेलच.

गोखले—त्याचा ताण फार जाणवत असे. लेखन तुकड्या तुकड्यांनीं (stop gaps) करावें लागे. वारंवार पुढें ढकलावे लागे. नातेवाईकांच्या ह्या वागण्यानें एक प्रकारचें एकाकित्व (Isolation) आलें. माझ्या लेखनाचा प्रवास आणि विकास एका vacuum मध्यें झाला आहे. अहो, मी नोकरी करीत असे तिथें परवां परवांपर्यंत लेखनांत थोडं नांव कमावलं आहे ह्याचा पत्ता नव्हता. साहित्याबद्दल कमी बोलत असे. कारण त्यांत कुणाला रुचि नव्हती. ह्या सर्व जंजाळांत माझी आई फक्त माझं कौतुक करीत राही.

प्रश्न —तुमच्या पहिल्या गोष्टीबद्दल आज तुम्हांला काय वाटतं ?

गोखले—'मांजराचा पोर' ही ती गोष्ट ! Impressionist मी होतो ह्याची मला जाणीव झाली. दुसरी गंमत आतां मला जाणवते ती अशी कीं मी, गाडगीळ व माडगुळकर (व्यंकटेश) ह्या तिघांच्याही पहिल्या कथा कुत्रा-मांजरावरच आहेत. मासिकांतली छापील गोष्ट मात्र 'हेअर कटिंग सलून' ही होय ! १९३६ सालीं ती लिहिली. लिहितांना Satirical Sense नव्हता. त्यावर त्यावेळीं प्रा. माटे यांनीं मला बोलावून त्यांतील सामाजिक आशयावर व्याख्यान दिलें. (पण मला त्यांचें म्हणणें समजलें नाहीं.) नामवंत मासिकांतली पहिली कथा **"वहिनीची इच्छा !"** ती **"मनोहर"**-मध्यें प्रसिद्ध झाली.

प्रश्न— हस्तलिखित मासिकांतल्या कवितेनंतर तुम्ही कधीं कवितांकडे वळलां नाहीं कां ?

गोखले— नाहीं. २००।३०० कविता माझ्या पाठ होत्या. कवितांचें मला वेडही होतें. आहेही. माधव ज्युलियन, तांबे, यशवंत मला चांगले पाठ होते. पण कविता लेखन करावें असें मात्र मला कधींच वाटलें नाहीं.

प्रश्न— तुमच्या लेखनावर असे कुणाचे संस्कार झाले ?

गोखले —प्रा. फडके, खांडेकर मी वाचले त्यावेळीं मी लहान होतों. फडके, खांडेकर या नांवांचें Glamour होते त्या काळांत ! आपटे, नाथ माधव, य. गो. जोशी, वोकिलहि आधाशासारखा वाचत असे. पण लेखनावर मात्र तसे कुणाचेच संस्कार झाले नाहींत... माझ्या बाबतींत काय आहे माहीत आहे का ? माझ्यावर लेखकापेक्षां लेखनाचा परिणाम फार होतो. कुणाचेंही कांहीं चांगलें वाचलें कीं मी मोहून जातों. त्यामुळें माझ्या आधींच्या, बरोबरच्या, नंतरच्या सर्वच लेखकांच्या चांगल्या लेखनानें मी सुखावलों आहे—संस्कारित झालों आहे. अगदीं शेकोव्ह इर्वाइंग पासून भावे—जी. ए. पर्यंत....

प्रश्न — ह्यामुळें फायदा काय झाला ?

गोखले — Freshness राहतो. नवनवीन प्रयोगाला आवाहन मिळत राहते. स्वतःच्या लेखनाला हुरुप येतो. वयपरत्वें कांहीं कांहीं Corners येतात. ते खटकतातही. पण तें अपरिहार्यच असते. Writings मुळें मात्र मला सतत असें आवाहन मिळत गेले आहे.

प्रश्न — तुम्ही प्रामुख्यानें कथेचेंच माध्यम स्वीकारलेलें दिसते. कादंबरी, नाटक वगैरे अन्य माध्यमांसंबंधीं कधीं आकर्षण वाटलें नाहीं काय?

गोखले —एकतर भींत भीत, चोरून लिहावें लागत होतें. त्यानंतर चित्रकथा लिहिण्याचा प्रयत्न केला.... सारखा निरनिराळ्या ठिकाणीं फेंकत फेंकत गेलों. त्यामुळें मला कादंबरीसारखा मोठा Span घेण्याइतकें स्वास्थ्य कधीं नव्हतेंच ! तो काळही मराठी कथेच्या दृष्टीनें सुवर्ण काळ होता. त्यामुळें 'कथा' ह्या माध्यमावर मी लक्ष केंद्रित केलें. अंतरकर सत्यकथेंत होते. त्यांनीं आणि 'यशवंत'च्या पाध्यांनीं मला प्रोत्साहन दिलें. हें प्रोत्साहन मला पूर्वी मिळालें असतें तर मी ह्यापूर्वीच बरेंचसें लिहिलें असतें.

प्रश्न – तरी पण तुम्ही पुष्कळ कथा लिहिल्या कीं !

गोखले —कथांची संख्या साधारणतः तीनशें पर्यंत भरेल.

प्रश्न — कच्चा खर्डा तयार करतां ? पूर्वी करीत होतांत ?

गोखले —छे हो ! तेवढं करायला वेळही नव्हता. कॉपी ठेवींत नव्हतों—नाहीं. रफ्-फेअरहि नाहीं. एक अंकी लिहायचं ! लिहून संपलं कीं दूर सरायचं !

प्रश्न — पण मग कथांची जंत्री वगैरे ठेवतां ?

गोखले — ठेवतो ना ! (असं म्हणून गोखल्यानीं रॅकवरची एक चारशें पानी वही काढली व ती माझ्यापुढें टाकली. त्या वहींत अगदीं पहिल्या कथेपासून ते आजतागायत सर्व कथांची नोंद होती. कधीं लिहिली. कुठें प्रसिद्ध झाली. कोणत्या कथासंग्रहांत पुढें ती टाकली गेली ह्या साऱ्यांची नोंद त्या वहींत आढळली)

प्रश्न — त्या नोंदीत नेमकें काय काय टिपून घेतां ?

गोखले—शीर्षक सुचलं तर तें ! आणि मुख्य म्हणजे Key Point जो असतो तो टिपून घेतो.

प्रश्न – तो Key Point नुसता वाचून मग प्रत्यक्ष लिहितांना एकदम सारें ध्यानीं येते ?

गोखले – येते. तशीच माझी पद्धत आहे.

प्रश्न – गोष्ट सुचल्यावर कांहीं काळ जावा लागत असेलच !

अनुक्रमणिका

गोखले – कांहीं कांहीं कथांचे बावत तसा जाणें आवश्यक असतेही !

प्रश्न – लिहितांना मग सारें झरझर लिहून टाकतां ?

गोखले — लिहिण्याचें माझें तंत्र मोठें विचित्र आहे. कथा हळूहळू मनांत फुलव राहाते व तेच पुरेसं वाटतं. मला लिहिण्याचा कंटाळा आहे. त्रास होतो. पहिली एक चतुर्थांश कथा लिहितांना मला हा त्रास जाणवतो. तो मी काढला कीं, मग मात्र सारं सुरळीत होतं. कधीं कधीं मी नायक नायिकांना नांवं काय द्यायची या विचारानें मी अस्वस्थ होतो. तर कधीं कधीं कांहीं शब्द अडवतात. सुरुवात सुचत नाहीं.

प्रश्न – मग एका वैठकींत कथा पूर्ण होत नसेल ?

गोखले — नाहीं. दोन तीन वेळां तरी बैठक करावी लागतेच. लिहिण्याचा नेहमींच मला विलक्षण शीण येतो. Nervous Tension येतं. लेखन मी सारखं पुढें ढकलीत राहतो. शीर्षकं, नांवं, शब्द सारीच अडवणूक ! लेखन सरलं कीं एक प्रकारचा Blankness येतो. अर्थात ह्या व्यापांत अवर्णनीय सुखाचेही क्षण येतात. तुम्हांला गंमत सांगतो. कांहीं कांहीं वेळां फार मजेशीर योगायोग घडले आहेत. "अविधवा" ही कथा मी लिहायला घेतली. नायिकेला नांव सुचेना. कांहींतरी नांव हवें होते. मी विचार करीत गॅलरींत उभा राहिलो. रस्त्यावरून माझ्या माहितीच्या 'इरावती' ह्या नांवाच्या बाई जातांना दिसल्या. माझा प्रश्न सुटला. नायिका इरावती झाली. कांहीं वेळेला कथा लिहून होते. आणि मग ज्या व्यक्तीवर कथा लिहिली असेल तीच व्यक्ति समोर येते. रिक्ता, उजळमाथा ह्या कथांबाबत असें घडलें आहे.

प्रश्न – कांहीं कथांमध्यें तुम्हीं प्रतिमांचा वापर केला आहे. त्या कशा सुचल्या ? उदाहरणार्थ, आभा सावंत ह्या गोष्टींतला 'बोका'— नेमका बोका कसा सुचला ?

गोखले – वयांत येणारी, रसरशीत अशी मुलगी मला रंगवायची होती. ती कथा लिहितांना असाच मी अडलों – तेव्हां गॅलरींत येऊन उभा राहिलो. तेवढ्यांत एक अतिशय तगडा असा बोका मला समोरच्या कौलावर दिसला. आणि माझी समस्या सुटली. तिला पुरुष दर्शनाची पावलं मांजराच्या पावलानं मला दाखवणं शक्य झालं. कांहीं गोष्टी अशा माझ्या बाबतींत घडत गेल्या खऱ्या !

प्रश्न — आणखी कांहीं योग ?

गोखले — मला स्वप्नांत एक संपूर्ण गोष्ट दिसली. आणि ती जशी दिसली तशी मी ती मग लिहून काढली.

प्रश्न :– सर्वसामान्यपणें असें मानलें जाते कीं, लेखनांत आत्मचरित्र येते. (Every piece of work is Autobiographical) ह्या वाक्यांतल्या सूचनेबद्दल आपल्या कार्याच्या संदर्भात काय म्हणतां येण्यासारखें आहे ?

गोखले – माझ्याही कथांत अशा आत्मचरित्र कथन करणाऱ्या कथा आहेत. आणि बऱ्याचशा चांगल्या कथांचें प्रमाण आत्मचरित्रात्मकच असतें असें मला वाटतें. अशा कांहीं कथा कांहींशा Melodramatic वाटल्या तरी त्या 'लिहिणं अपरिहार्य असतं. आयुष्यांत तसं घडलं किंवा घडावं असं लेखक लिहित असतो. •

प्रश्न – १९४२ च्या सालच्या चळवळीशीं दिल्लीला असतांना तुमचा संबंध आला होता. त्या पार्श्वभूमीवर आपण कांहीं लेखन केलें आहे काय ?

गोखले — फक्त "**मिथिला**" ही गोष्ट लिहिली. त्यांतल्या व्यक्ति खऱ्या, त्यांतले अनुभव सच्चे आहेत. एक कादंबरी लिहायचा विचार होता. पण तें शक्य झालें नाहीं.

प्रश्न – बाकीच्या कथा कशा सुचतात ?

गोखले – कांहीं व्यक्ति आपल्या व्यथा मला देऊन जातात. अनय, व्रती, उर्मी, मंजुळा या कथांचा ह्या संदर्भात उल्लेख करतां येईल. कांहीं कथा कुणीतरी सांगितलेल्या हकीगतीवरून लिहितां येतात (सूड); कांहीं ठिकाणीं दोघांची पात्रा–प्रसंगांची बेरीज करून कथा तयार होते (रिक्ता, अविधवा, शोध) कांहीं ठिकाणीं अनेक अनुभवांची बेरीज होते (केशर वर्दे, शपथ) आणि कांहीं कथा अनेक वर्षांच्या पाहणीतून चिंतन चर्चेतून साकार होतात (वारस, अभोगी, चाहूल, के) आणि कांहीं कथा पाहिलेल्या व्यक्ति व प्रसंगांतून घडल्या तशा लिहिल्या आहेत (अवमानिता, विघ्नहर्ती, अपरिमिता, अनामिका, उजळमाथा, विदाय बोन्दु, भूकंप). आणि कांहीं कथा इझनाबारी प्रसंग व व्यक्ति यांच्या मिश्रणांतून आलेल्या आहेत (पाठलाग, शुभा)

प्रश्न – यांत संपूर्ण काल्पनिकाचा कुठें उल्लेख आलेला नाहीं.

गोखले – संपूर्ण काल्पनिक असें कांहीं साहित्यांत येते असें मला वाटत नाहीं.

प्रश्न — तुमच्या कथांत निवेदन कौसल्यावर अधिक भर असतो. त्यांतून तुम्ही गोष्ट मारून नेतां असें म्हटलें जाते. आपलें काय मत आहे ?

गोखले – मला मुळांत लिहिण्याचाच आळस आहे. भाषा चांगली व निवेदन आकर्षक असे शेरे वाचले कीं' मलाच गंमत वाटते कारण आलेला वा व्यक्त करावयाचा अनुभव व्यक्त कसा करावयाचा हाच मुळीं माझ्यापुढें प्रश्न असतो.

**(पान ६५ वर पहा)**













अनुक्रमणिका

सैन्य हीच खरोखर आमची लडाखमधील पुण्याई आहे. लडाख ओसाड असेल, रेताड असेल. पण लडाख आमचा आहे. आमचें घर सुंदर नसेलही. पण म्हणून परक्यानें आमच्या घरांत घुसावें काय ? आमच्या घरांतच आमची विटंबना व्हावी काय ? कुठलें स्वाभिमानी राष्ट्र हें सहन करील ?—




# उत्तरदिग्विजय

पु. भा. भावे

**पंचहौद** मिशनमधल्या चहा प्रकरणाप्रमाणेंच आमच्या ह्या चहाचाहि बराच गवगवा झाला आहे. ह्या प्रकरणाचे वरेवाईट अर्थ अनेक लावले गेले व वरेवाईट उपयोगहि केले गेले. येथें हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, 'चहा' ही ह्या प्रकरणांतील महत्त्वाची गोष्ट नव्हे. चहा कधीं न पाहिलेलीं आम्ही माणसें नव्हतों. चहा उशीरा मिळाल्यामुळें किंवा न मिळाल्यामुळें आमच्यापैकीं कुणाचेहि प्राण गेले नसते. बोलून चालून आम्ही आघाडीकडे निघालों होतों. अपरिहार्यपणें येणाऱ्या अडचणींविषयीं कुणाचेंच कांहीं म्हणणें नव्हतें. परंतु जें घडलें, तें अपरिहार्य अडचणींत जमा होण्यासारखें नव्हतें. सैनिकी अधिकाऱ्यानें एखादी योजना ठरवावी, त्याला एखादें वचन दिलें जावें, व केवळ असहकारामुळें त्याची ती योजना पार पडूं नये, त्याला खालीं पाहण्याचा प्रसंग यावा ह्याचा अर्थ काय होतो ! सैन्याला शक्य तितक्या सुखसोयी उपलब्ध करून देणें साऱ्यांचेंच कर्तव्य आहे. ह्या सुखसोयींवर सैन्याची कार्यक्षमता अवलंबून असते. ज्या उर्मट अडवणुकीनें आम्हाला चहा व जेवण नाकारलें त्याच वृत्तीनें उद्यां भुकेल्या सैनिकाला अन्न व निवारा नाकारला तर ? नागरी अधिकाऱ्याच्या लहरीपायीं सेनाधिकाऱ्याच्या पदरीं दोष व अपेश आलें तर ? पांच पाहुण्यांची ठरलेली व्यवस्था जे शांततेच्या काळांत करीत नाहीत ते अधिक विकट प्रसंगीं काय करतील ? ब्रिटिश काळांत सेनाधिकाऱ्याला दिलेलें वचन ह्या प्रकारें मोडणें व त्याला बेलाशक धुडकावून लावणें शक्य झालें असतें काय ? त्या काळांत सेनाधिकारी उर्मटपणें वागत असतीलहि. परंतु म्हणून ह्या काळांत नागरी कर्मचाऱ्यांनीं सेनाधिकाऱ्याशीं उर्मटपणें वागणें, त्याला आश्वासित सहकार्य नाकारणें, दिलेलें वचन मोडणें, हें तरी हितपरिणामी ठरण्यासारखें आहे काय ? लोकहितास अथवा लोकराज्यास ही प्रवृत्ति उपकारक ठरण्यासारखी आहे काय ?

एखादी योजना पार पाडावयाची, तर ती योजना पार पाडण्यासाठीं आवश्यक ते अधिकार व दंडशक्ति (Sanction) सेनाधिकाऱ्यांपाशीं पाहिजे. अगदी जनताराज्य झालें तरी कुणाहि अनधिकारी अलबत्या-गलबत्यानें सैन्याचा पोरखेळ करून ठेवणें, हें कुणाच्याच हिताचें नाहीं. देशाच्या वा जनतेच्याहि हिताचें नाहीं. शिपायानें जनतेचा मान राखला पाहिजे हें खरें पण जनतेनेंहि शिपायाचा मान राखला पाहिजे. त्याला परोपरीनें साहाय्य केलें पाहिजे हेंहि खरें. सैन्याला तुच्छ लेखणें व हास्यास्पद करणें हें अंतीं आम्हीच हास्यास्पद होण्यासारखें व तुच्छ ठरण्यासारखें आहे. ह्या साऱ्या चहा प्रकरणांत खरोखर कांहीं आक्षेपार्ह असेल तर ती एका वरिष्ठ सेनाधिकाऱ्याला तुच्छ लेखणारी व हतबल करून सोडणारी वृत्ति आहे. ह्या वृत्तीचा परिचय करून देण्यासाठींच ह्या चहा प्रकरणाविषयीं एवढ्या विस्तारानें लिहिलें आहे.

परंतु आम्ही डाकबंगला सोडला व आमचा ह्या वृत्तीशीं संबंध संपला. लेह गांवांतून आम्ही आल्या मार्गानें बाहेर पडलों. सूत गुंडाळलेलें स्तूपासारखें कांहीं मागें टाकलें, गांवाला हिरवेपणा देणारीं पॉपलरचीं झाडें मागें टाकलीं, नाला मागें टाकला व धूळगोटे उडवीत आम्ही छावणींत येऊन पोहोंचलों.

तंबूच तंबू तिथें विखुरले होते. सैनिकी वाहनें धांवत होतीं. ही जशी कांहीं एक प्रचंड परात होती. सभोंवार वर्फानें माखलेले डोंगर उभे होते. घळींतून रांगोळीसारख्या हिमरेषांच्या सुरकुत्या उमटल्या होत्या. सूर्य कलत होता व छावणीच्या त्या प्रचंड परातींत थंडी सांचत होती. सूर्याला रंग होता परंतु उष्णता नव्हती.








# प्रेमाप्रमाणें संघर्ष व संहार हा जीवनाचा न्याय !

मैत्र महाशयांनीं ह्या छावणींतले दोन तंबू आमच्यासाठीं रिकामे केले. "टॉप हॅट" सारखे हे 'मोंगल टेण्टस' होते. गोल, उभे व कांवळयांनीं मढविलेले. वेताच्या आकाराचे. येथेंच आम्ही आमचें आटोपशीर सामान टाकलें व मग थोडया विश्रांतीनंतर मैत्र महाशयांसमवेत जागोजाग पसरलेल्या त्या छावणींत भटकून आलों. आपल्या कांहीं अधिकारी मित्रांकडे मैत्रांनीं आम्हाला नेले. अधिकाऱ्यांनीं व शिपायांनीं आपल्या तंबूसाठीं शक्य तितक्या सुंदर जागा निवडल्या होत्या. झाडें व गवत जोपासून त्यांनीं त्या जागा सुंदर बनविल्या होत्या. ह्या विस्तीर्ण तंबू शेजारींच निवळशंख पाण्याचा ओहोळ वहात होता. उतारावरून तेथें येऊन पोहोंचतां पोहोंचतां आमची दमछाक झाली. पण त्यानंतर दिसला तो देखावा डोळयांना आनंद देणारा होता.

पायांना प्रत्यक्ष हिरवळीचा स्पर्श होत होता. ओढा खळखळ करीत वहात होता. तंबूसमोर मेज व खुर्च्या मांडलेल्या होत्या. आणि आमच्या हातांत वाफेचे श्वास सोडणाऱ्या चहाचे पेले होते. मला वाटलें, एखाद्या लडाख उमरखय्यामचें स्वप्न असेंच कांहीं तरी असेल. मात्र येथें सारा कारभार पुरुषांचा होता. हें जग त्यांनींच वसविलें व सजविलें होते. लडाखच्या ओसाडींत येथें एक मोठें नगरच निर्माण झालें होतें. कुठलीं माणसें कुठें आलीं होतीं. पंजाबी, मराठी, राजपूत, जाठ, मल्याळी! हिंदुस्थानच्या कानाकोपऱ्यांतून हिंदुस्थानच्या सीमा लढविण्यासाठीं माणसें येथें जमा झालीं होतीं. त्यांनीं येथें ह्या धर्मकार्यार्थ जमावें असाच ह्या अनामिक जागेचा योग होता. आणि येथें जमा झालेलीं हीं सारीं माणसें देशांतल्या अन्य माणसांवर अवलंबून होतीं. त्यांचें कर्तव्य, त्यांचा उत्साह, त्यांची वीरश्री, सारी एका परीनें आमच्या उत्साहावर, कर्तृत्वावर व वीरश्रीवर अवलंबून होती. एका सैनिकाला कार्यक्षम ठेवण्यासाठीं चारसहा विनलढाऊ माणसांनीं कार्यतप्तर रहाणें आवश्यक होतें. काश्मीर-शासनाच्या सेनेंतला तो ओव्हरसियर मला क्षणभर आठवला, आणि मन विपण्ण झालें.

धुळीचे लोट उडवीत आमची जीप परत निघाली तेव्हां उन्हें उतरलीं होतीं. थंडी वाढली होती. खूण नसलेल्या एकरंगी आकाशांतून अचूक विमान थांवतें कसें ह्या प्रश्नासारखाच प्रश्न खूण नसलेल्या त्या वैराण ओसाडींतून अचूक हाकल्या जाणाऱ्या वाहनाकडे पाहून मला पडला. लडाखच्या अंतरंगांत अधिक शिरलों तेव्हां हें प्रश्नचिन्ह वाढत गेलें. परंतु न मापलेल्या त्या ओसाडींत वाट चुकण्याचा प्रकार असा सहसा घडलाच नाहीं.

आतांहि आम्ही सुखरूप छावणीवर येऊन पोहोचलों. रोटी आणि वायुबंद वाटाण्यांच्या उसळीचा फराळ केला. (ह्या प्रवासांत जन्मभर पुरतील इतके वाटाणे आमच्या पोटांत गेले). बहुतेकांना भुका जेमतेमच होत्या. परंतु थंडीविषयीं दुमत नव्हतें. रात्रीबरोबरच थंडी वाढत चालली. पोटांत गरम अन्न गेलें, त्याचाहि परिणाम थंडी वाढविण्यांत झाला. होते तितके घालतां व येतील तितके कपडे आधींच आमच्या अंगावर होते. थंडीसवें फुगडया खेळणाऱ्या लडाखच्या चावऱ्या वाऱ्याला तोंड देतां यावें म्हणून विशेष बनावटीचा एकेक वायुबंद डगलाहि मैत्रांनीं आम्हांला बहाल केला होता. गरम बनियन, साधें बनियन, शर्ट, पुलओव्हर, गरम कोट, साध्या सुताची गरम विजार, माकडटोपी व आतांच मिळालेला हा सैनिकी डगला अशी एकापेक्षां एक महावस्त्रें माझ्या अंगावर होतीं. तरीहि गारव्याच्या दुःशासनानें कौरवसभेंतल्या द्रौपदीसारखी आमची अवस्था करून सोडली.

बरोबर आणलेलीं ऊनी पांघरुणें विचारीं येथें कितीशीं पुरणार? म्हणून मैत्र महाशयांनीं आम्हांला एकेक "अंगाई पिशवी" (Sleeping Bag) देऊन ठेवली होती. तिचा उपयोगहि शिकविला होता.

ही पिशवी म्हणजेच आमचें अंथरुण व पांघरुणहि होतें. तिला आंतून गाद्या होत्या. मुस्कुट घालावयास "चहा टोपी" (teacosy) सारखी शिरस्त्राणवजा टोपी जोडलेली होती. छातीवर बांधावयास बंद होते. ह्या पिशवींत माणूस एकदां शिरला म्हणजे गवसणींतल्या तंबोऱ्याची कळा त्याला येत असे. हालचाल करायची सोय नाहीं. वळतांना दहादां विचार करावा लागे. ह्या पिशवींत शिरणें हेंच मुळीं एक मोठें दिव्य होतें. कारण तेवढयाहि श्रमानें माणूस थकून जाई. बंद बांधावयाचें त्राण उरत नसें. शिरस्त्राणांत मुंडी खुपसण्यापूर्वी असाच विचार करावा लागे. प्रथम पिशवींत शिरायचें. मग धापा टाकीत पांचपन्नास पळ निपचित पडायचें. मग मोठा निर्वाणीचा निश्चय करून मुंड–पिशवींत डोकें सरकवायचें. मग पुन्हां विश्रांती. नंतर शेवटचे 'हरहर महादेव' म्हणून बंद बांधायचे, व बराच वेळ मुडद्यासारखें पडून राहायचें.

असा तो विलक्षण विधी होता. एवढें सारें केल्यावर वरून ऊनी पांघरूण लागतच होतें. तें पांघरूण अंगावर घेणें हें 'कफन' अंगावर घेण्याइतकें कष्टप्रद वाटे. आम्ही परस्परांना शक्य तें सहाय्य करीतच होतों. सैनिकी डगल्याचे सरकदोर (Zip) ओढण्यासाठीं व गांठीं बांधण्यासाठीं हटकून मला कुणाची तरी कुमक लागे. रस्सीखेंच खेळण्याइतपत तरी तो व्यायाम होता. गुंड्या लावून देणें, बंद बांधून घेणें ह्यासारख्या गोष्टी लहानपणीं वडीलधाऱ्यांनीं केल्या, त्यानंतर तशाच प्रमाणावर त्या येथें घडल्या. त्यानंतर गाईगाई !

लडाखमधली पहिली रात्र ! त्या रात्रीं कुणाला झोंप आली. कुणाला आली नाहीं. 'गाई गवसणींत' शिरल्यावर मला आठवलें तें "Epic of Mount Everest" नांवाचे यंगहजबंड साहेबांचें गौरीशंकर चढाई विषयींचें पुस्तक. 'गाई पिशव्यां'चीं वर्णनें प्रथम मी त्या पुस्तकांत वाचलीं. आत त्याच हिमालयांत, तशाच एका पिशवींत








मी झोंपलों होतों. पिशव्यांनीं ऊब तर पुरेपूर दिली होती. पण शरीर जखडबंद करून ठेवलें होतें. चेहऱ्यावर 'सुगंधी साय' (क्रीम) चोपडलेली होती. तिच्या त्याच त्या वासाचा एक उच्छाद होऊन बसला होता. पण चेहरा घड ठेवायचा असेल तर साय लावणें आवश्यक आहे असें मैत्र महाशयांनीं सांगितलें होतें. म्हणून झोंपण्यापूर्वी तोंडाला 'क्रीम' फासण्याचा विधी, रमणीजनांच्या उत्साहाला लाजवील अशा कांटेकोरपणें आम्ही पार पाडला होता. सर्वश्री सबनीस, माडगूळकर, देशपांडे व मी स्वतः म्हणजे प्रत्यक्ष मानवी खडक! आम्ही चेहऱ्यावरून क्रीमचीं कोमल बोटें फिरविणें अगदीं कसेसेच दिसत होते. मी तर तें पाप सहसा केलेलेंच नव्हतें. तरी तो विधी शेवटच्या दिवसापर्यंत करणें प्राप्त होतें.

प्रत्येकाच्या मुखकमलाला प्रतिरात्रीं एकाच छापाचा सुगंध! त्या सुगंधाच्या गुंगींतच मला झोंप लागली. झोपेंत मला 'क्रीम' लावलेले डोंगर दिसत होते. मध्येच केव्हांतरी मी जागा झालों. प्रथम मी कोठें आहे तेंच मला कळेना. स्थळकाळाचा शोध लावण्याची धडपड मी करीत असतांच माडगूळकरांनीं विचारलें,

"काय बोवा, झोंप लागली कीं नाहीं?"

"लागली होती. आतांच गेली." मी उत्तर दिलें व विचारलें, "तुम्हांला लागली कीं नाहीं झोंप?"

"लागली साधारण. नीटशी नाहीं. पलीकडच्या तंबूंत काय हाल आहे कोण जाणे!"

"कळेल सकाळीं!" मी म्हणालों.

"जगलों तर कळेल." माडगूळकरांनीं उत्तर केलें.

"असे निराश कां होता बोवा? अजून पंचवटींत पुष्कळ रात्रीं आपल्याला घालवायच्या आहेत!"

"ही काळरात्र संपेल तेव्हां त्या रात्री घालविणार!" माडगूळकरांनीं प्रथम विनोदाचा सूर लावला व मग हळूंहळूं त्यांच्या घोरण्याचा सूर माझ्या कानीं पडला. मीहि महत्प्रयासानें कूस पालटली, व त्या प्रवासांत माझ्या अंगावरचें पांघरूण खालीं गेलें. मी कांहीं वेळ नुसताच पडून राहिलों. हात लांबवून पांघरूण उचलणें हें मला द्रोणागिरी उचलण्याइतकेंच अवघड काम वाटत होतें.

तरी माझ्या वाट्याला आज एक बऱ्यापैकीं खाट आली होती. पुढच्या प्रवासांत तर दारुगोळ्याच्या डब्यावर ठेवलेल्या फळ्याच शय्या म्हणून गोड मानून घ्याव्या लागत. जराहि हालचाल केली कीं डबे एकीकडे जात, फळ्या एकीकडे जात व हातपाय तिसरीकडे जात! बरें हें सारें त्रांगडें सरळ करूं म्हटलें, तर धाप लागून जायची वेळ येत असे. भीष्मांची शरशय्याहि मला वाटतें ह्यापेक्षां कमी कष्टपद असेल. एरवीं साधें कूस पालटणें, व पांघरूण ओढणें म्हणजे गोष्ट ती काय! जन्मभर ह्या गोष्टी आम्ही केल्या होत्या. पण तेंच आतां जीवावरचें काम होऊन बसलें. तसेंहि असलें तरी पडलेलें पांघरूण उचलणें मला प्राप्तच होतें. अंगातल्या खंडीभर कपड्यामुळें आमचे बाळसेदार आकार अधिकच वाढले होते. हालचाल अधिकच कठीण झाली होती. तरीहि जीवाचा धडा करून ती हालचाल मी केलीच. कसेतरी मी पांघरूण उचललें व उन्हांत फिरून आलेल्या कुत्र्याप्रमाणें जिभा काढीत डोळे मिटले.

**शेठजीचा उपदेश**

'मागणी हो भारी। पुरवठा थोडा
भाव तो बापुडा। वर चढे ॥
सांगे अर्थशास्त्र। शिका आतां तरी
हा तो काळाबाजारी। म्हणूं नका ॥'

—'आंदर्टी'

मी पुन्हां डोळे उघडले तेव्हा फटफटलें होतं. थंडी सर्वत्र भिजून बसली होती. बाहेरच्या बादलींतला बर्फाचा मला मोठा तुकडाच सबनीसांनीं आम्हाला आणून दाखविला. तें कौतुक पहायला मी तंबूबाहेर पडलों. कनातीशीं एक कुत्रें वेटोळें घालून पडलें होतें. कुठलीहि पिशवी न घेतां ती सारी रात्र त्या श्वानवीरानें बाहेर काढली होती.

एकूण प्राण्यांची जीवेच्छा त्या थंडीपेक्षांहि बलवत्तर होती. म्हणून तर माणसें लडाखमध्येंहि तगून होतीं. हा बराचसा संवयीचा प्रश्न होता. आम्ही लडाखमध्यें नवे म्हणून आम्हाला त्या थंडीचें कौतुक होतें. पण हिमालयाच्या गोठविणाऱ्या थंडींतच तेनसिंगाचे शेर्पा जगत होते. एवढेंच नव्हे, तर ओझींहि वाहून नेत होते. दूरस्थ गोऱ्या माणसांनीं गौरीशंकरावर चढाई केल्याविषयीं त्यांचें कौतुक व्हावें हें योग्यच होतें, पण शेर्पांच्या सहाय्याविना ती त्यांना गोष्ट जड गेली असती. शेर्पांनीं थंडी पचविली होती. आम्हीहि थंडी पचविण्याच्या मार्गावर होतों. सकाळचे कांहीं विधी असे आहेत कीं, तेव्हां थंडी सरळ अंगावर घ्यावीच लागते. तंबूंतल्या साहेबी व्यवस्था मला स्वतःला अस्वच्छ वाटत होत्या. म्हणून मी चांगला दोन फर्लांग हिंदुस्थानी व्यवस्थेकडे चालत गेलों.

त्या दिवशीं तपमान शून्याखालीं सरासरी चार अंश होतें, पण त्या थंडीनें माझें तसें कांहीं बिघडविलें नाहीं. पाणी उपलब्ध असतें तर नेहमींप्रमाणें मी दोन वेळा स्नानदेखील केलें असतें. परंतु आतां मी व आम्ही साऱ्यांनींच नुसतीं तोंडं धुतलीं. दाढ्या न करण्याचा आम्ही साऱ्यांनीं पणच केला होता. त्यामुळें चारदोन दिवसांतच आम्ही अगदीं "टोळीवाल्या सारखे" दिसूं लागलों. पापण्या भुवयांसकट अंग धुळीनें माखलेलें. नाकाचे शेंडे लाल झालेले. डोक्यावर माकडटोप्या व अंगांत दुप्पट आकार दाखविणारे कपडे. अशा वेषांत आमची ओळख आम्हांलाच पटणें कठीण झालें. ह्या 'कायाकल्पाचा' आज प्रारंभ होता. सर्व कपड्यासकट आम्ही न्याहारी करीत होतों. चहाचे कपामागून कप रिचवीत होतों व श्रीनगरहून आणलेल्या सिगरेटच्या साठ्याचा धूर करीत होतों.

आम्हा पांचीजणांत अतिशय नीटनेटके गृहस्थ वसंतराव कानेटकर हे होते. यथेच्छ पाण्यानें यथेच्छ तोंड धुणें. शक्य तो दाढी करणं, कपड्यांची काळजी घेणें, ह्यांत त्यांनीं कधीं चूक केली नाहीं. ह्या साऱ्या प्रकारांत त्यांच्या केसाची एक बटहि इकडची तिकडे झाल्याचें मला आठवत नाहीं. समाजांत

मिरवितांना देखाव्यासाठीं नीटनेटकेपणानें पुष्कळ माणसें वागतात, पण ऐन रानांतहि जो माणूस आपला नीटनेटकेपणा सांभाळतो, त्याचा नीटनेटकेपणा खरा ! कानेटकरांचा नीटनेटकेपणा अशा अव्वल जातीचा होता.

कानेटकर जितके नीटनेटके तितकेच माडगूळकर अव्यवस्थित. एकट्यानें प्रवास करावयास अगदीं अयोग्य. सारखें त्यांचें कांहींतरी हरवत असतें. ह्या प्रवासांत एकदां त्यांची आंगठी हरवली. एकदां एक हातमोजाच अदृश्य झाला. हातरुमाल हरवणें ही तर नेहमीचीच गोष्ट होती. पण कडाक्याच्या थंडीत हातमोजा हरविणें ही गंभीर घटना झाली. मग बिचारे माडगूळकर हाताभोंवतीं गळपट्ट्याचें टोंक गुंडाळूनच वावरत होते. मी समोर केलेला माझा मोजा त्यांनीं कधीं वापरला आणि कधी नाकारला. कारण कुणाला तरी एक मोजा कमी पडणारच होता. आणि लेखकाचा हात गारठला म्हणजे त्याचा अवतारच संपला. परंतु माडगूळकर जितके अव्यवस्थित आहेत, तितकेच भाग्यवान आहेत. प्रवासांत हरवलेली त्यांची एकूण एक वस्तु प्रवास संपण्यापूर्वीच सांपडली. आंगठी सांपडली. मोजाहि सांपडला. आंगठी प्रत्येकाच्या हितास जपणाऱ्या सवनीसांनीं शोधून काढली. मोजा शोधण्याचें श्रेयहि त्यांचेंच ! कांहीं नाहीं तर जातां जातां माडगूळकर श्रीनगरांत आपली गरम वंडीच विसरून गेले.

मी एकटाच मागें राहिलों होतों. क्रमांक सव्वीसच्या खोलींत खुंटीवर त्यांची बंडी लोंबतांना मी पाहिली. व येतांना ती परत आणली. एकूण काय कीं हा निष्काळजी माणूस दैववान आहे. मात्र प्रवासांत त्यांची काळजी घेण्यासाठीं एकतर बरोबर सौ. विद्यावहिनी पाहिजेत, किंवा "नेम्या" सारखा ऋणानुबंधी पाहिजे, किंवा कुणी प्रेमाचे मित्र तरी पाहिजेत. एरवीं एक दिवस माडगूळकर स्वतःला हरवून बसतील.

आतां आज त्यांच्या गुंड्याच हरवल्या होत्या. न्याहारी करून आम्हांला मैत्रमहाशयांसमवेत बाहेर पडायचें होतें. आणि माडगूळकरांच्या तर गुंड्या सांपडत नव्हत्या. अडचणींत असलेल्या माणसाच्या सहाय्याला धांवायचें हा सवनीसांचा बाणा आहे. पु. ल. देशपांड्यांचें पालकत्व तेच करीत होते. मलाहि त्यांनीं अनेकदां हातभार लावला होता. सरकदोर ओढण्यासाठीं म्हणा, गांठोडें बांधण्यासाठीं म्हणा, त्यांनींच माडगूळकरांच्या गुंड्याहि शोधून काढल्या. व दोन वाहनांतून आम्ही बाहेर पडलों. कांहीं क्रोशार्धावरील एका छावणींत आम्हांस जावयाचें होतें.

आज तेथें दसऱ्याचा समारंभ होता. मी माडगूळकरांना म्हणालों, "स्वामी, आज गुरख्यांचा दसरा कसा ? आपला दिवाळीदसरा तर केव्हांच झाला !"

"आपली सध्यां होळी धुळवड चालू आहे." धुळीच्या ढगाचा पंजानें प्रतिकार करीत माडगूळकर म्हणाले, "अहो दादा, आपण येथें आलों ना, म्हणून त्यांचा आज दिवाळी दसरा आहे,"

माडगूळकरांच्या विनोदाला संतवचनाचा आधार होता. आम्ही एव्हांना साधुवैराग्यासारखे दिसत होतो खरेंच. तरी हा रस्ता त्यांतल्या त्यांत बरा होता. एरवी लडाखमधले रस्ते बैलगाढवानाहि "हाय" म्हणायला लावतील असे होते. ते रस्ते नव्हतेच. डोंगर धुळीवर उमटलेल्या त्या केवळ चाकोऱ्या होत्या. त्या मानानें हा रस्ता पक्का होता.

मधूनच मला सळसळत जाणारा निळ्याहिरव्या पाण्याचा पट्टा दिसला. त्या कोरड्या करड्या भूमीवर तो पट्टा फारच खुलून दिसत होता. मी मैत्र महाशयांना पुसलें,

"ही सिंधू का ? सिंधू असेल, तर क्षणभर आपण येथें उतरूं."

"आपण जिथें जातों आहोंत तिथें ही सिंधू आहेच." मैत्र महाशय म्हणाले, "इथें कशाला उतरायला पाहिजे ?"

मग आम्ही उतरायचें तिथेंच उतरलों. एका चढणींतल्या सपाटीवर खुर्च्या ठेवलेल्या होत्या. त्यावर भारतीय सैन्यांतले लहानमोठे अधिकारी बसले होते. खालच्या अंगास दोन खांब कांहीं अंतरावर एका रेषेंत गाडले होते. खांबावर 'कुकरी'चें चित्र रंगविलें होतें. खांबामध्यें वधस्तंभ बसविला होता. आमच्या समोरच्या उंचवट्यावर रांगेनें गणवेषधारी गुरखे बसले होते. जवळच बळी द्यावयाचे अजापुत्र दिसत होते. हे लडाखी बोकड ठेंगणेठुसके, केसाळ व मोठे सुंदर होते. त्यांच्यापैकीं कांहीं जबडे हलवीत होते, व कांहीं प्रेमचेष्टादि करीत होते. मरणाच्या छायेंत माणसेंहि अशीच वागत असतात. हे तर बोलूनचालून पशु होते. त्यांच्यापैकीं कांहींना जवळ येऊन ठेपलेल्या मृत्यूची जाणीव होती. कांहींना नव्हती. कांहीं अस्वस्थ होते. कांहीं स्वस्थ होते. संवेदनाक्षम व संवेदनाशून्य माणसांत असेंच अंतर असतें. तेंच अंतर त्या प्राण्यांत होतें. खांद्यावर धोतराचे सोगे घेतलेले दोन उघडे पुरोहित सूर लावून मंत्र म्हणत होते. वैदिक मंत्रांचें तें नेपाळी भाषांतर असल्याचें कुणीतरी आम्हांला सांगितलें. म्हणजे




**'टेरिलीन पिस् दिल्याशिवाय आईला स्वर्गसुख मिळणार नाहीं म्हणतात....'**

क्षीण स्वरांत कां होईना, पण सिंधु तीरावर अद्याप वेदमंत्रांचें पठण चालूं होतें म्हणायचें. त्या मंत्रघोषांतच एक पारवा आकाशांत सोडण्यांत आला. व त्याला सोबत करण्यासाठीं दोन पक्ष्यांच्या मानेवर कुकरीचे घाव पडले. नंतर बोकड-मेंढचांची पाळी आली. कुकरीच्या एकेक घावांत एकेक मस्तक धडावेगळें होते होतें. वधवेदीला रिंगण घालून एक जवान मुंडकावेगळें धड धांवत धांवत ओढून नेत होता. रक्ताच्या रेषा उमटत होत्या. मग दुसऱ्या पशूची मान वधस्तंभावर ठेवली जात होती. 'खट्'कन छन्नी. क्वचित् पशूचें वेंवटणें. कधीं वेंवटण्यासाठीं उघडलेलें तोंड तसेंच राही. शब्द उमटतच नसे. असे. एकूण चोवीस प्राणी त्या दिवशीं निजधामास गेले. हें बलिदान चालूं असतांच मी कुणी अहिंसाचार्य आहे असें मानून एक अधिकारी मला म्हणाला,

"अद्याप ह्या रानटी रूढीपायीं येथें मुक्या प्राण्याचें रक्त सांडलें जातें, ही मोठी खेदाची गोष्ट आहे !"

"तुमची भावना मला कळते." मी म्हणालों, "पण अद्याप भूतलावर निरपराध माणसांचें रक्त सांडलें जातें, ही अधिक खेदाची गोष्ट आहे."

मंत्रघोषांत पशूंचें बलिदान चालूं असतांच गणवेषांतले जवान 'बीअर' व 'रम'चे पेले फिरवीत होते. थंड बिअर (Chilled Beer) हे कोरड्या प्रदेशांत मोठें आकर्षक पेय मानलें जातें. येथें शून्याखालीं गेलेल्या वायुमानामुळें बीअर आपोआपच थंड झाली होती. पेल्यांतल्या सोनेरी द्रवावर पांढऱ्या फेसाचे मुकुट चढले होते. त्या मुकुटाकडे पहात दुसरा एक अधिकारी मला म्हणाला,

"मद्यपानाच्या पद्धतीला पायबंद घालण्याचा शक्य तो प्रयत्न आम्ही करीत आहोंत !"

"आनंदाची गोष्ट आहे !" मी उत्तर दिलें. "परंतु कुठल्याहि जुन्या परंपरेला पायबंद घालण्यापूर्वी बराच विचार केला पाहिजे. गुरखे पूर्वापार मद्यपान करीत आले आहेत. त्यांचें शौर्य वादातीत आहे. जर्मन, जपानी, ब्रिटिश सारेच लढवय्ये मद्यपान करतात. अति थंड असा हा प्रदेश आहे. तेव्हां उपयुक्त ठरेल व आनंद होईल, इतपत मद्यपानाला विरोध नसावा !"

ह्यावर (मला वाटतें) तो अधिकारी मिशींतल्या मिशींत हंसला. दारूबंदीचा मी कुणी कट्टा पुरस्कर्ता आहे असें त्याला वाटेनासे झाले व मद्यबंदीच्या प्रयत्नाविषयीचें बोलणें बंद करून तो अधिक उपयुक्त उद्योगाकडे वळला.

मध्यंतरांत दुर्गामातेचा जयजयकार चालूंच होता. प्रसादपात्र फिरत होतें. एका सैनिकी तंबूंत दुर्गामातेची प्रतिष्ठापना झालेली होती. कुकरी पुन्हां पुन्हां वर उचलली जात होती व बळींचीं मुंडकीं उडत होतीं. तें दृश्य पाहून मघेंच देशपांड्यांनीं डोळ्यावर हात ठेवला व ते उद्गारले, "दादा, तुमच्यानें हें पाहवतें ?"

"पाहतो आहे खरा !" मी उत्तर दिलें. वयाच्या चौदा-पंधराव्या वर्षी माझ्या वडिलांनीं केलेलें एक शवच्छेदन (Post Mortem) मीं पाहिलें होतें. नवऱ्यानें डोक्यांत दगड घालून मारलेल्या एका तरुण स्त्रीचें तें प्रेत होतें. मानवी देहाचे विरक्ती आणणारें अंतरंग त्या दिवशीं मी पाहिलें. त्यानंतर कित्येक दिवस मला धड जेवण गेलें नाहीं. घास घेतला कीं त्या मुलीच्या पोटांतून निघालेले अन्नांश मला दिसूं लागत. पुढें माझी दृष्टि मेली. कुटुंबांतल्या सहासात डॉक्टरांच्या सहवासांत हें अद्याप घडतें. त्या पशूचा मृत्यु न हिचकतां आतां मी पाहूं शकत होतों. पशूविषयीं मला प्रेम वाटतें. कुत्रा, घोडे, गाय, बकरी ह्यासारखे प्राणी माणसांचे मित्र आहेत. हे प्राणी माणसांवर प्रेम करतात. त्यांना मारण्याचा व त्यांचा अन्न म्हणून उपयोग करण्याचा माणसाला काय अधिकार आहे ? आपल्या मित्रांचें मांस खाण्याचा प्रकार राक्षसीच नव्हे तर काय ? पण एक जीव दुसऱ्या जीवाचें भक्षण करून जगतो खरा!

मोठा मासा लहान माशाला खातो. त्याच्या जीवनाची तीच अट आहे. ही अट निसर्गनिर्मित आहे. अनुल्लंघनीय आहे. प्रेमाप्रमाणेंच संघर्ष व संहार हाहि जीवनाचा एक न्याय आहे. तो उपेक्षून कुणाचा कसा निभाव लागेल ? चीननें त्याच न्यायाचा साक्षात्कार आम्हांला घडविला. निरपराध भारतावर त्यानें शस्त्र उचललें. शस्त्राचा प्रतिकार शस्त्रानें करणें प्राप्त झालें. अगदीं मानवी मूल्यें जगविण्यासाठींसुद्धां शस्त्राचार, संघर्ष व प्रतिकार अटळ होते. ह्या सिंधुतीरावरच सुरसंस्कृतीचें रक्षण करण्यासाठीं अनेक संघर्ष झाले नाहींत काय ?

सिंधु ! सिंधु शेजारींच असल्याचें मला स्मरण झालें. मी उठलों व उजव्या अंगाच्या उतारावरून चालूं लागलों. राहुट्या, कुंपणें, खळगे, व दगडगोटे पार करीत मी सिंधु तटापर्यंत जाऊन आलों.

मी परत आल्यावर कानेटकर उद्गारले, "ब्रेव्हो भावे !"

तें अंतर फार तर दोन अडीच फर्लांगांचें असेल. पण दोन मैल धांवल्यासारखी धाप मला लागली होती. गौरीशंकराचें शिखर गाठूं इच्छिणाऱ्या पर्वतवीरांना शेवटचे सहस्रपांचशे यार्डहि शक्तीबाहेरचे कां वाटत असतील व तेवढ्या अंतरावरून ते परत कां फिरत असतील तें आतां मला कळलें. मी परत आलों व खुर्चीवर कोसळलों.

एव्हांना बलिदान विधी आटोपला होता. पशूंच्या मस्तकांना अग्निस्पर्श झाला होता. त्यांचीं धडें एका ओळींत विसावलीं होतीं. प्रदक्षिणा विधी संपला होता. टिळे लागले होते. सभोंवार गणवेषांतले गुरखे गरजत होते "दुर्गा माता की जय !", "भारत माता की जय !", "गोरखनाथ महाराज की जय !" त्याच जयनादानें दिशा दुमदुमत होत्या. ते तंबू, तीं शस्त्रें, तें रक्त व तो जयनाद ! एखाद्या परीकथेंत शोभेल असें तें दृश्य होतें.

तोंच सिंधू तटावरील त्या नीरव शांततेंत माडगूळकरांचा शब्द घुमूं लागला. जवानांना उद्देशून माडगूळकर म्हणत होते,

"नेपाळांतील पशुपतेश्वराचा पुजारी महाराष्ट्रांतील ब्राह्मण असतो. मी मराठी ब्राह्मण आहे. आजच्या बलिदानाचें पौरोहित्य मी केलें असतें. देशासाठीं ह्या हिमालयांत तुम्ही खडतर तपश्चर्या करीत आहांत. मी तुम्हांला वंदना देतों."






माडगूळकर अस्खलित हिंदींत बोलत होते. त्यांचें हिंदी उत्तम होतें एवढेंच नव्हे तर त्यांचे हिंदी उच्चार अचुक होते. एरवीं इंग्रजीचें व हिंदीचेंहि आम्ही बोलतां बोलतां 'मराठीकरण' करून टाकतों. माडगूळकरांचे तसें झालें नाहीं. भाषणाच्या शेवटीं गुरखा गडचांनीं ह्या मराठी गडचाला टाळचा दिल्या व त्याचा जयजयकारहि केला. गणवेषधारी गुरख्याकडून हिमालयांत जयजयकार मिळविणारे माडगूळकर हे पहिलेच मराठी लेखक असावेत. हा सोहोळा संपला व भारतमातेच्या व दुर्गाभवानीच्या जयघोषांत आम्ही ह्या सैनिकांचा निरोप घेतला. आमच्या आयुष्यांत दसऱ्याचे सण आयुष्याच्या वर्षाइतकेच येऊन गेले. ह्या दिवशीं अनेकदां आम्ही मेजवान्या झोडल्या, नव्या टोप्या कुडती अडकावून आपटचाचें 'सोनें' लुटलें, परंतु सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवण्यासारखा अपूर्व दसरा समारंभ केवळ हाच म्हटला पाहिजे. हा दिवस दिनांक २६ ऑक्टोबर ६३ हा होता.

एखाद्या समाजाची खरोखर चांगली ओळख करून घ्यावयाची तर त्या समाजांतल्या एखाद्या कुटुंबांत राहिले पाहिजे. कुटुंबांत राहणें तर आम्हांस शक्य नव्हते, पण परतीच्या वाटेवर एका मुस्लीम घरांत आम्ही टेकलों. हें घर "थिपसें" नामक खेडचांतलें होतें. सभोवार पांढुरक्या रंगाचीं शेतें होतीं. पाण्याचा पाट वहात होता. जवळपास "विलो"चीं झाडें होतीं.

"ज्याच्या क्रिकेट बॅटी बनवतात तो विलो हाच काय ?" असा प्रश्न मी केला, त्याला होकारार्थी उत्तर मिळालें.

"येथें शेती पिकते कशाची ?" ह्या प्रश्नाला "थोडा भात व सातू" असें उत्तर मिळालें. लडाख हा तसा नापीक व परावलंबी प्रदेश आहे. माजीपाला डोळचांना दिसणें कठीण. कुक्कुटफळेंहि बाहेरून येतात व लेहला येईपर्यंत त्यांचें मूल्य रुपयाला एक अंडें इतपत वाढतें. आतां येथें बटाटचाचें पीक काढण्याचे शासकीय प्रयोग चालू आहेत. कुक्कुटपालनाचें बीजारोपण होत आहे. चिनी आक्रमणापासून भारताच्या अन्य भागाशीं लडाखचें दळणवळणहि वाढलें आहे. मार्ग बांधले जात आहेत. व तेथें लडाखी लोकांना काम मिळतें.

आमच्या मुस्लीम यजमानाभोंवतीं खेडचांतलीं आणखी कांहीं माणसें जमलीं होतीं. यजमान व तीं माणसेंहि आमच्याशीं व परस्पराशीं बोलत होतीं. बोलतां बोलतां त्यांच्या केसाळ टोप्यांचीं कुंडलें कानावर हलत होतीं. "घुसल जुम्मे के जुम्मे !" हें त्या साऱ्यांचेंच ब्रीदवाक्य असावें. त्यांचे कपडे किटलेले होते. शरीरांवर मळाचे थर दिसत होते. पण वर्ण मात्र झळझळीत होते. वागणें बोलणें तप्त होतें. चहा व उकडलेलीं अंडीं समोर ठेवून त्यांनीं आमचा पाहुणचार केला. "बिस्मिल्ला" म्हणून त्या वस्तूंचा आम्ही समाचार घेतला. स्वच्छतेविषयीं फाजील विचार करण्याचें कारणच नव्हतें. आम्ही तरी स्नानें कुठें केलीं होतीं ? केवळ पाण्याच्या अभावामुळें व वायुमानामुळेंच येथें माणसांना व त्यांच्या कपडचांना स्नानें घडत नाहींत हें मात्र मला पूर्णांशानें खरें वाटत नाहीं. बराचसा हा संस्काराचा व संवयीचा प्रश्न आहे. ज्यानें तीसावर माणसें फांशी जातांना पाहिलीं, अशा एका वरिष्ठ तुरुंगाधिकाऱ्याला मी एकदां विचारलें,

"मरणापूर्वी माणसें काय मागतात ?"

त्यानें उत्तर दिलें, "बहुतेक सगळे हिंदु फांशी जाण्यापूर्वी स्नान करण्याची इच्छा दर्शवितात." आतां बोलूनचालून मरायला जात असतां स्नान केलें काय किंवा न केलें काय त्याला अर्थ किती ? पण नाहीं, मरण्यापूर्वी हिंदू स्नान करून मरूं इच्छितों. इतका हा संस्कार बलवत्तर आहे.

इथले संस्कार वेगळे आहेत. आमच्या दाढीवाल्या यजमानानें तेंच आम्हांला सांगितलें. येथें ऐक्याचा संस्कार आहे. मुस्लीम व बुद्धांत आंतरधार्मिक लग्नें होतात. सासरचा धर्म तो मुलीचा धर्म. मांसाशनाच्या विषयांत बुद्ध-मुस्लिमांचें दुमत नाहीं. ह्या घरांत पडदा होता कीं नव्हता तें कळावयास मार्ग नाहीं पण बायका बाहेर वावरतांना दिसल्या नाहींत.

घरांत लाकडाचे खांब भरपूर व बळकट होते. घर जवळजवळ वायुबंद होतें. इकडे साधारण चौकोनी अशीं धाब्याचीं घरें पुष्कळ दिसतात. वऱ्हाडांतील माणसांना ती ओळखीची वाटतील. तेथें पावसाळयांत धाब्यावर व भिंतीवर गवताचें एक छोटेसें कुरणच उगवतें. येथें धाब्यावर गवत उगवत नाहीं. पण रचून ठेवलें जातें. दुरून भास होतो घरावर गवत उगवल्याचा.

ह्या घरांतून यथावकाश आम्ही बाहेर पडलों. गांवांतलीं पोरें आमच्या भोंवतीं जमलीं. त्यांनीं लडाखी उच्चारांत "जनगणमन" म्हणून दाखविलें. तें आम्हांला उत्तम प्रकारें ओळखूं आलें. अन्य गाणींहि झालीं. कंठ फुगवून मुक्त स्वरांत गाणारीं तीं मुलें फारच लोभसवाणीं दिसत होतीं. येथेंच आमचें लडाखी थोरापोरासमवेत एक छायाचित्रहि घेतलें गेलें. आणि मग आम्ही मार्गस्थ झालों. सैनिकी अधिकाऱ्यासकट प्रवास करणाऱ्या आम्हांला वाटेचे वाटसरू वंदना देत होते. मुलें तर वंदना दिल्याविना रहातच नव्हतीं. भारतीय सैनिकांची ही पुण्याई होती.

सैन्य हीच खरोखर आमची लडाखमधील पुण्याई आहे. लडाख ओसाड असेल, रेताड असेल, पण लडाख आमचा आहे. आमचें घर सुंदर नसेलहि पण म्हणून परक्यानें आमच्या घरांत घुसावें काय ? आमच्या घरांतच आमची विटंबना व्हावी काय ? कुठलें स्वाभिमानी राष्ट्र हें सहन करील ? सैन्यानें आमचे स्वत्व येथें प्रस्थापित केलें होतें. आमचा अभिमान राखला. लडाखच्या भूमीवर त्यांनीं आपलें रक्त शिंपडलें होतें. वाटेवर मिळणाऱ्या वंदना त्या रक्ताला होत्या. त्यागाचे, पराक्रमाचे व देशप्रेमाचें प्रतीक असलेल्या त्या गणवेषाला होत्या.

(क्रमशः)










"जें विरघळत नाहीं तें बर्फ कुठलं ? वाहत नाहीं तें पाणी कुठलं ? जो गोड लागत नाहीं तो मध कुठला ? आणि तरी मी म्हणत होतों कीं, बर्फ विरघळत नाहीं. त्याचं असं झालं—"

—श्री. म. जोशी



**सर्वच** सामान्य व्यवहारांबद्दल इतरांच्या ज्या समजुती असतात त्या माझ्या नाहींत — बऱ्याच अंशीं नाहींत. सामान्यांच्या असामान्य गोष्टींबद्दल मला माहिती आहे आणि असामान्यांच्या सामान्य माणसांसारख्या प्रकारांबद्दल मला माहिती आहेत आणि म्हणूनच मी बऱ्याच वेळेला जें सांगतों तें विक्षिप्त नि विचित्र वाटतं, वेगळं वाटतं. कारण ह्या वाटेनं कुणी फारसं गेलेलं नसतं. मग माझ्या बरोबरचे विशी-पंचविशींतले रमेश नि कपूर हे दोस्त असं कां म्हणणार नाहींत ? कारण मी त्यांना सांगत होतों कीं बर्फ वितळत नाहीं, विरघळत नाहीं. कारण त्यांनीं वा त्यांच्या पिढीनं पाहिलेलं बर्फ वेगळं होतं आणि मी दाखवत असलेलं बर्फ वेगळं होतं ! "काकाजी, काय वाटेल तें म्हणा, जें विरघळत नाहीं तें बर्फ कुठलं ? जें वाहत नाहीं तें पाणी कुठलं ? जो गोड लागत नाहीं तो मध कुठला ?" पण तरीहि मी हेंच म्हणत होतों कीं बर्फ विरघळत नाहीं. कारण मी म्हणत असलेल्या बर्फाला एक वेगळा आकार होता, एक वेगळं रूप होतं, एक वेगळा गंध होता, एक वेगळी चव होती आणि हें वेगळेंपणच त्यांना पसंत नव्हतं — त्यांनाच काय पण कुणालाहि तें पसंत पडलं नसतं. तें पसंत पडण्याजोगं नव्हतंच मुळीं. कारण त्याच असं झालं —

ध्वनिमुद्रिकांच्या संग्रहालयांतून मी आणि बेबी बाहेर पडलों — मी विचारलं "आवडल्या का तुला ह्या ?" "हं" आणि चौकापर्यंत येऊन पोहोंचलों तोंच रमेश, कपूरचे तें शब्द "होय काकाजीं ! हें असंच असतं ! बर्फ विरघळतं, बर्फ वितळतं ! हेंच आम्ही पाहिलं !" प्रत्यक्षांत रमेश, कपूर तिथं नसूनहि माझ्या कानांत फार मोठ्यानं घुमून गेले !

चौकावरच्या इराण्याच्या हॉटेलकडे वळूं लागलों.

"चल ! इराण्याकडे चहा घेऊं !"

"इराण्याकडे !"

"होय ! इराण्याकडे ! एवढ्यासाठींच तर आम्ही इराणी पाळले आहेत. त्यांनीं आम्हांला चहा करून दिला पाहिजे, आम्लेट खाऊं घातलं पाहिजे, सँडविचेस् कशीं लागतात हें दाखवलं पाहिजे !"

"ह्या उकाड्यांत तुम्ही चहा घेणार ? त्यापेक्षां आइस्क्रीम घ्या ! गोल्डस्पॉट घ्या, सॉसियो घ्या !"

"इराण्याकडे जाऊन चहा घेतल्याशिवाय मला चैन पडत नाहीं ! तूं वाटल्यास सॉसियो घे ! आइस्क्रीम खा !"

"बरं चला तर !"

इराण्याकडे सॉसियो पिऊन आम्ही बाहेर पडलों. कपूर नि रमेशचे शब्द पुन्हां पाठलाग करूं लागले, "पाहिलंत काकाजी ! हें असं होतं. कांहींतरी मिळवण्यासाठीं मनुष्य कांहींतरी सोडून देतो. आज इराण्याकडे जाऊन तुम्ही चहा नाहीं घेतला — सॉसियो घेतलं ! आज नेहमींसारखे वागला नाहीं तुम्ही ! काकाजी, आम्ही हेंच ऐकलं आहे, हेंच वाचलं आहे आणि हेंच पाहतों आहों !" कपूर नि रमेशचे शब्द घुमत राहिले.

रस्त्याचं वळण ओलांडून आम्ही मोठ्या रस्त्याला लागलों — फूटपाथवर एक मूर्ति विकणारा बसला होता. बेबीचे पाय घुटमळूं लागले —



अनुक्रमणिका

"किती छान मूर्ति आहेत नाहीं ?"

मीहि थबकलों —

"होय बेबी ! ही राधाकृष्णाची, शंकर पार्वतीची, नर्तकनर्तकेची — साऱ्याच मूर्ति मोठ्या छान आहेत !"

"आवडल्या का तुम्हांला ?"

"हो आवडल्या कीं !"

कपूर नि रमेशचे डोळे वघून गेले, चेहरे हंसून गेले, ओठ वोलून गेले — "काकाजी ! ह्या अशाच — अशाच आवडीनिवडी असतात ! एकाला आवडतं तेंच दुसऱ्याला आवडतं ! आणि आपल्या आवडीचं मनुष्य दुसऱ्यांना आवडावं अशा पद्धतीनं देत असतो ! आणि ह्याची परतफेड होत असते — आणि ही देवाणघेवाण चालूंच असते — ही थांवते एकाच वेळीं —

"नाहीं ! बेबी, ह्या मूर्ति आवडल्या तरीं मी घेणार नाहीं !"

"कां ?"

"घेतल्यानंतर जितकं सुख वाटतं ना त्यापेक्षां त्या फुटल्या कीं दुःख वाटतं — फार दुःख वाटतं ! तें टाकतां येत नाहीं — सोडतां येत नाहीं !"

आम्ही पुढं चालूं लागलों — फूटपाथच्या कडेलाच एक गजरे विकणारा मोगऱ्याचे गजरे विकत होता — ओरडत होता — मोतियाचा गजरा, जिवाचा लाडका, खूष करा खूष करा आणि संध्याकाळच्या वेळेला फिरायला वाहेर पडलेलीं मंडळी गजरे घेत होतीं, वेण्या घेत होतीं — अनेक रंगीत वस्त्रं फडफडून जात होतीं— त्या उकाड्याच्या दिवसांतहि तें फार सुखकर दृश्य होतं, शांत दृश्य होतं — रम्य दृश्य होतं. एक नवपरिणीत जोडपं थवकलं — अस्मानी फिक्या रंगाच्या साडीनं एक गजरा एका नेहरू शर्टवाल्या हातावर रुळवून टाकला आणि वेणी घातली गेली.

रमेश नि कपूर डोळे मिचकावत म्हणाले, "काकाजी घेऊन टाका एक वेणी !" "अरे ! मी फार शौकिन आहे, ह्या हातावर फार वेळां गजरे रुळवले आहेत, त्या गंधानं मी धुंद होऊन गेलेलों आहे–ह्यांत नवीन काय आहे !"

"तुम्हांला मोगरा आवडतो ?"

"होय ! मला मोगऱ्याचा वास फार आवडतो — मोगऱ्याचीं फुलं ह्याच वासाकरतां ज्ञानेश्वरांना आवडत असत — ते चटकन् लिहून गेले 'मोगरा फुलेला — मोगरा फुलेला !"

"आणखी कसलीं फुलं आवडतात तुम्हांला !"

"मला फार कमी प्रकारचीं फुलं आवडतात — पण आवडतात तीं नेहमीं आवडतात. मोगऱ्याचीं फुलं टाकलेलं पाणीसुद्धां मला आवडतं ! आणि सोनचांफ्याचीं फुलं आवडतात. त्याच्या पाकळ्या जरा मोठ्या असतात पण मुलायम असतात. त्यांचा रंग पिवळसर सोनेरी असतो पण फार शोभणारा असतो — मोगरा मला गंधाकरतां आवडतो, सोनचांफा मला रंगाकरतां आवडतो–हीं दोन्ही फुलं मी हातांत खेळवतों, कुरवाळतों — कारण हा गंध आणि हा रंग मला धुंद करून टाकतो — भोंवतालचं विसरायला लावतो !"

"तुम्हांला हा रंग आवडतो ?" ती स्वतःकडेच पाहत खालच्या मानेनं म्हणाली.

"होय हा रंग आवडतो — ही शाल पहा ना ही ह्याच सोनेरी पिवळसर रंगाची आहे !"

"म्हणजे तुम्हांला सोनचांफ्याचा फक्त रंगच आवडतो !"

"हो कारण त्याचा रंग छान आहे नि ह्याचा गंध छान आहे !"

कपूर नि रमेश जणूं बोलले "काकाजी, जाऊं द्या घेऊन टाका ना वेणी ! अहो हेंच आम्ही ऐकलंय् — असंच आम्ही ऐकलंय् — रंग नि गंध, शब्द नि सूर, रम्य आणि उत्कट हींच इथलीं चलतीं नाणीं आहेत — हेंच वर्फ वितळतं ! काकाजी वर्फ वितळतं हेंच खरं आहे ! जो माणूस ह्या अठराविशींतल्या मुलींशीं ह्या वेणी गजऱ्यांच्या सान्निध्यांत रंगरूप, रेखागंत्र हें वोलत नाहीं नि घेऊन देत नाहीं तो विक्षिप्त नि विचित्र झाला तरी माणूस आहे अखेर माणूसच आहे — वर्फ वितळतं हेंच खरं !"

"चला फार वेळ उभें राहिलों आपण !"

"एक गजरा —" नि आम्ही वस स्टँडकडे निघालों — वस सुटत होती — आम्ही धांवत होतों — मी नि ही बेबी — माझा शर्ट फडफडत होता, शाल फडफडत होती, गजऱ्याच्या गंधानं मी धुंद होतों.

"चल बेबी ! चल, वस सुटली !"

वसनें वेग घेतला होता. ही शहराच्या बाहेर जाणारी शेवटची वस होती.

"जाऊं दे ! टॅक्सीनं जाऊं !"

"नको ! ती पहा ! वस वळून थांवते आहे !"



बस थांबल्यासारखी झाली. मी फूटबोर्डावरून उडी घेतली — बस पुन्हां वेग घेत होती. बेबी धांवत होती — तिनं माझा हात धरला नि बस पकडली—

रेशमी शालीवर मोरपंखी पातळ सळसळते नि समोरच्या चित्रगृहाजवळील पानपट्टीच्या दुकानासमोर उभे असलेले कपूर नि रमेश पानं चघळूं लागले —

"काकाजी ! आम्ही हेंच वाचत आलोंय्, हेंच ऐकत आलोंय् हेंच पाहत आलोंय् — हेंच घडतं आणि असंच घडतं ! तेंच सहज आहे नि तेच स्वाभाविक आहे ! बर्फ वितळतं नि बर्फ विरघळतं— वितळणार नाहीं तें बर्फ कुठलं नि विरघळणार नाहीं तें तरी बर्फ कुठलं ! त्यांत काय आहे ?"

☆ ☆ ☆

मला वाटतं तो जानेवारीचा महिना असावा. अतिशय कडाक्याची थंडी पडलेली होती. मी माझ्या बंगलीतल्या अंथरुणावर उठून बसत होतों. रात्रीं तीन वाजेपर्यंत जागरण झालेलं होतं. डोळे उघडायला तयार नव्हते. झोप हटत नव्हती. थंडी फारच पडलेली होती. धुकंहि उतरूं लागलेलं होतं. कालच्या रात्रीच्या मैफलीतल्या चीजा घोळवत मी उठलों — "याद पियाकी आये —" "पियाके मिलनकी आस —" गाणारा धुंद होऊन गात होता — साऱ्या रसिकांना तृप्त करून गेला होता — गुंग करून गेला होता — डोलवत ठेऊन गेला होता — बहार करून सोडली होती त्यानं — तीच बहार रेंगाळत होती. अवघे पांचसुद्धां वाजायचे होते आणि मी उठलों. सारीं दारं बंद असूनसुद्धां थंडी वाटतच होती — उठलों— वाहत्या पाण्याकरतां गेलों — नळ सोडला. हात कांपवत पाणी पडलं — आणि मग —

एका मागून एक, एका मागून एक तांबे ओतत राहिलों — घंगाळ रिकामं करत राहिलों — बराच वेळ माझं "जय गंगे — जय नर्मदा मैय्या चाललंच होतं — आतां पाण्याचं थंडपण भासत नव्हतं — मग सबंध अंग खसखसून पुसलं आणि अजूनहि मी गाढ गाढ धुंदीतच होतों. सगळा सूट चढवून, स्कार्फ गळयाभोंवतीं लपेटून बाहेरच्या आवारांत एक खुर्ची टाकून आरामांत बसलों; पण इतका आराम कांहीं पुरला नाहीं — टीपाय आणून ठेवलं — आणि त्याच्यावर पाय टेकून पडून राहिलों. धुकं दाट होतं — जवळची झाडंझुडपंसुद्धां नीटशीं दिसत नव्हतीं. बागेचं कंपाऊंड दिसत नव्हतं, वेलीं फुलं, कारंजं कांहीं कांहीं दिसत नव्हतं — रस्त्यावरचे दिवेसुद्धां काजव्यासारखे दिसत होते. मी जिवंत होतों तो इतकंच केवळ पाहूं शकत होतों कीं माझ्या हातांतला पाईप पेटलाय् नि त्याचा रंग लालसर आहे—बाकी शरीर आहे ह्या बाबतींत 'दिसणं' ही संज्ञा नव्हती, गोष्ट नव्हती, 'दिसणं' नव्हतंच मुळीं ! काय भाग होता तो फक्त आवाजाचा, ध्वनीचा, नादाचा, शब्दांचा नि सूरांचा ! बस् ऐकणं तेवढंच ! कुठं तरी शेजारीं घड्याळाचा गजर झालेला ऐकला — बहुधा परीक्षेसाठीं लवकर उठणारा कोणी जागा झालेला असावा — घड्याळांतले ठोके पडलेले ऐकूं आले — बहुधा ते सहाचे असावे — ह्या एवढ्याच ऐकण्याच्या तंतूनं मी जीवन ह्या गोष्टीशीं बांधला गेलों होतों. रस्त्यावरून दोन टांगे खडखडत गेले — ते टांगे दिसले नव्हते फक्त खडखडण्याचा आवाज आला होता — नंतर एक दूध केंद्राची नेहमींची जाणारी गाडी गेली असावी — असावी कारण तोहि एक आवाज होता ! चार कुत्रींहि कुठंतरी भुंकत होतीं कारण तोहि आवाज होता —! हें धुकं दाट धुकं होतं, नि प्रत्यक्ष माझ्या पाईपाचा धूरसुद्धां नीट दिसत नव्हता ! दृश्याच्या पलीकडचं हें सारं होतं ! पण शब्दांच्या, आवाजाच्या, नादाच्या नि सूरांच्या तें फार जवळचं होतं ! ते सूरच घोटाळत होते आणि मी गात होतों — एक ज्ञानेश्वरांचा अभंग — "आतां आमोद सुनासी आले !" आणि दाट धुकं उतरत होतं, आणखी दाट होत होतं—

माझ्याच बंगलीच्या डाव्या बाजूच्या खोलींत झोपलेले रमेश नि कपूर अजून उठले नव्हते. रमेश विशींतून बाविशींत, कपूर पंचविशींतून सत्तावीशींत, आलेला होता तिशी माझीहि उलटली होती— बेबी गेल्या दोनतीन वर्षांत मंगळसूत्र लेऊन गेली होती, एका गोंडस मुलाची आई झाली होती, मधून मधून वाटेवरच्या माझ्या बंगलीकडे नवऱ्यासह आणि मुलासह येत होती —

आणि अशी एक सकाळ होत होती — धुकं फारच दाट झालं होतं — मी शांतपणें पाईप पेटवून बसलों होतों आणि ज्ञानेश्वरांचा अभंग गात होतों — सारं इतकं शांत होतं. "आहेत, बाहेरच बसलेले दिसताहेत !"

मी खुर्चीवरच रेलून मागं पाहिलं ! फाटक खडखडलं, उघडलं नि बेबी बाबागाडी लोटत आंत आली !

"या !" मी उद्‌गारलों आणि पुन्हां खुर्चीवर रेललों.

"मला वाटलं होतं कीं तुम्हीं उठला नसाल म्हणून !"

"कां ?"

"कालचं जागरण आहे ना मैफलीचं !"

"म्हणून काय झालं ! उठलों — फार लवकर उठलों — चांगली थंड पाण्यानं मनाजोगी आंघोळ केली आणि बसलोंय् इथं गात !"

"गातां आहांत !"

"हो गातोंच आहे !"

"ह्याला गाणं म्हणतात ?"

"ह्याला गाणं म्हणत नाहींत — अभंग म्हणतात — माझा फार आवडता आहे तो — फार खुषींत असलों म्हणजे मी अभंगच गुणगुणत बसतों — एकटा असलों कीं गात बसतों !"

"काकाजी ! ही म्हणते तेंच खरं ! तुम्ही फार फार विक्षिप्त आहांत ! ह्या वयांत तुम्ही अभंग गातां ! इतक्या लवकर उठतां ! चला आंत चला !"

"कां ? तुम्ही काय कमी विक्षिप्त आहांत ! ह्या थंडींत इतकं दंव पडत असतांना, इतकं दाट धुकं पडत असतांना ह्या बाळाला घेऊन फिरायला बाहेर पडतां !"

"एक संवय म्हणून ! आणि बाहेर पडलें तेव्हां धुकं दाट नव्हतं — आणि फिरणं थांबवलं कीं आम्ही ! लगेच इथंच आलों !"

"तरीहि काकाजी चला ! आंत चला !"

मी ती बाबागाडी घेऊन व्हरांड्यात गेलों. "बेबी ! ती बघ पलिकडच्या खोलींत रजई आहे ती लपेटून टाक ह्याच्याभोंवतीं !"

"चला ! आंत चला !"

अनुक्रमणिका







"नाहीं — आंत जाऊन तुम्ही ही उजव्या बाजूची खिडकी उघडा — तिथूनच बोलेन तुमच्याशीं !"

"काकाजी आंत चला ! हे अंगावरचे गरम कपडेसुद्धां भिजले तुमचे ! किती वेळ बाहेर बसलां होतात तुम्ही !"

"खूप वेळ आणि अजूनहि बसणार आहे ! हेंच मला आवडतंय्– जा तुम्ही लवकर जाऊन त्या बाळाकडे पहा."

"चला हो ! ते काकाजी विक्षिप्त आहेत — ते नाहीं आपलं ऐकायचे !"

तीं दोघं मुलाला घेऊन आंत गेलीं आणि दिव्यांचा प्रकाश लुकलुकला. अजून धुकं दाट होतं ! खिडकी उघडली गेली पण प्रकाशाचा झोत म्हणून कांहीं बाहेर आल्यासारखा वाटला नाहीं !

त्यांना बाळाला लपेटायला कांहीं सांपडत नव्हतसं वाटलं. मी आंत गेलों. माझ्या अंथरुणावरची ती फिकट सोनेरी पिवळसर रजई काढली. ती लपेटून तें पोर स्वस्थावलं. "थांबा ! चहा ठेऊन येतों तोंपर्यंत हें ऐका."

ध्वनिमुद्रिका वाजूं लागली. मी चहाच्या तयारींत राहिलों आणि बाहेर आलों —

"काकाजी ! तुम्ही फार विक्षिप्त आहांत !"

"तें एकमतानंच ठरलंय् !"

"अहो ह्या वयांत अभंग गाताय्, ही रेकॉर्ड लावताय् !"

"होय ! ही रेकॉर्ड चमत्कारिक आहे असंच म्हणायचंय् ना तुम्हांला !"

"हो ना ! स्तोत्र कसलं वाजवताय् तुम्ही !"

"मग तर तुम्हांला वाटतो त्यापेक्षां मी विक्षिप्त आहे आणि वाटते त्यापेक्षां ही रेकॉर्ड वेगळी आहे."

"असेल असेल काकाजी !"

"असेल नाहीं – आहे – हें श्रीकृष्णाचं स्तोत्र आहे – संस्कृत स्तोत्र आहे हें – हें एका मुसलमान गाणारणीनं गायलेलं आहे–होय ! गीता सांगणाऱ्या नि गोकुळ गाजवणाऱ्या हिंदूंच्या देवाचं हें संस्कृत स्तोत्र एका मुसलमान बाईनं गायलंय्"

कुणास ठाऊक मी आणखीही कांहीं बोलतच राहिलों असतों पण तें पोर रडूं लागलं — मी खेळवत राहिलों पण त्याचं रडं थांबेना.

जवळच असलेल्या एका मातीच्या पोपटाच्या खेळण्यांत पाणी भरून मी तोंडानं वाजवूं लागलों–पोपटाचा आवाज ऐकून तें पोर कांहीं काळ स्वस्थ बसलं–पुन्हां रडूं लागलं.

"काकाजी, तें असं रडणं थांबवणार नाहीं !"

"कां ? ह्या घरांत मोठीं माणसं रडत आलीं तर तीं सुद्धां हंसत जातात मग हें कांहीं हंसणार ?"

"काकाजी हें लहान मूल आहे—" "तुमची ही बेबी ह्या पेक्षांहि लहान होऊन ह्या काकाजीकडे आली होती. तुमचा प्रेमविवाह आहे नाहीं का ? आणि तो तिच्या वडिलांना पसंत नव्हता नाहीं का ? एकतर तिला माहेर तरी सोडावं लागणार होतं अथवा लग्न तरी मोडावं लागणार होतं. अशी एकदां ही बेबी रडत आली....."

पलिकडच्या खोलींतून कपूर नि रमेश उठल्याचं समजलं — "या कपूर या रमेश ये !"

"काकाजी लवकरच उठलांत तुम्ही !" "होय." कपूर नि रमेश हंसले केवळ मी विक्षिप्त म्हणून !

"बघ बेबी ! बघा ! हे दोघं कसे हंसताहेत ते ! बेबी अशीच एकदम हंसली – मला प्रश्न होता ह्या तुमच्या लग्नाच्या वेळीं कीं घाव कुठं घालायचा ! एका लांकडी ओंडक्यावर कीं उद्यां फुलणाऱ्या वेलीवर ! पण लग्न, प्रेम ह्या फार फार कोमल वस्तू आहेत— मला कशाचवर घाव घालणं पसंत पडेना आणि मग ह्या बंगलीच्या रूपानं ह्या बेबीचं माहेर उभं राहिलं ! कळलं ! Children very little children !

आणि त्या पोराला मी खेळवत राहिलों. तें हंसत होतं पण त्याचं रडणं पूर्णपणें थांबत नव्हतं !

मी नीट पाहूं लागलों.

"बेबी ! घर ह्याला !"

मी चटकन् बाहेर गेलों. बाहेरच्या तुळशीवृंदावनांतली काळी माती आणली–ओली काळी माती आणली–मघाशीं खिडकी उघडल्यान उडणारी एक गांधील माशी त्या बाळाच्या गालास चावली होती मी ती माती आणली— आणि त्या बाळाच्या गालाला लावूं लागलों.

"काकाजी ! गालाला ओली काळी माती कां लावताय् ? विक्षिप्तच आहांत !" एवढं म्हणून बेबीच्या नवऱ्यानं त्या बाळाला जरा ओढूनच घेतलं—

"असेन मी विक्षिप्त असेन ! पण ही तुळस पवित्र आहे–नि ही काळी माती थंड आहे, औषधी आहे—अतां ह्याला गार वाटेल– हा रडायचं थांबेल !"

आणि तें पोर मी खेळवूं लागलों. तें हंसूं लागलं त्याचं रडणं थांबलं.—

"पाहिलंत कपूर ! पाहिलंत रमेश ! पाहिलंस बेबी ! पाहिलंस! बर्फ वितळतं— हो बर्फ वितळतं— पण तुम्ही वितळणारं जें बर्फ पाहिलं तें गाडीवर मिळतं, तें रंगीत पाण्यानं रंगवतां येतं, गोळ्यांच्या आकारानं विकतां येतं–तें आईस्क्रीम असतं–हें बर्फ फार वेगळं आहे– हें गाडीवर मिळत नाहीं–रंगीत पाण्यानं रंगत नाहीं आणि विकतां तर येतच नाहीं. हें हिमालयाचं बर्फ असतं–हिम असतं ! हें वितळतं नि गंगा दुथडी वाहते–भोंवतालच्या प्रदेशांत सुजलाम् सुफलाम् करत वाहते ! हें तें बर्फ असतं कपूर ! हें असं बर्फ असतं रमेश ! नि हें वितळलं तरी हिमालय तेवढाच राहतो, तेवढाच उंच राहतो ! कारण हें वेगळं बर्फ असतं !

मी तें पोर खेळवत होतों–तें हंसत होतं नि माझे डोळे पाण्यानं डबडबत होते !

●●●


रिॲलिस्टिक चित्रकला !

“दुःखितांच्या नयनांतील आसू पुसणे ही आपल्या पिढीतील सर्वात मोठ्या माणसाची महत्त्वाकांक्षा होती. ती पुरी करणे कदाचित आपल्या शक्ती पलीकडचे असेल; पण जोवर दुःखित जनतेच्या नयनांतून अश्रू येत आहेत तोवर हे कर्तव्य संपणार नाही. आणि म्हणून आपले आदर्श स्वप्न साकार करण्यासाठीं आपण निष्ठेने अपार कष्ट केले पाहिजेत; कार्य करीत राहिले पाहिजे.”

—जवाहरलाल नेहरू

# दुःखितांच्या डोळ्यांतील अश्रू पुसलेच पाहिजेत...

“आपल्या पुढील महान कर्तव्य पार पाडण्यास आपण तयार राहू या — स्वतंत्र, प्रगतीशील व सामर्थ्यवान भारत आणि जेथे युद्ध न होता शांतता नांदेल असे जग या दोहोंची निर्मिती — हीच म. गांधी व पं. नेहरू यांची सुयोग्य स्मारके ठरतील.”

—लाल बहादुर शास्त्री
पंतप्रधान

---

आपले ध्येय स्पष्ट आहे – प्रत्येकाला सुरक्षित, संपन्न जीवन.

ते साध्य करण्यासाठी सर्वांगीण प्रयत्नांची नितांत आवश्यकता आहे; दारिद्र्य व बेकारी नष्ट करून सर्वासाठी अन्न, कपडा व घर यांची तरतूद निश्चित केली पाहिजे.

हे समाजवादी ध्येय गाठण्यासाठी आपण आगेकूच करू या.

त्यासाठी चालू परिस्थितीच्या आव्हानाला आपण शिस्तीने व एकजुटीने तोंड दिले पाहिजे

---

# जय हिंद

**एकता टिकवा, जिद्दीने काम करा**

DA 64/150








अनुक्रमणिका

# क्लार्क गॅबल मिस्टर किंग!

"समव्हेअर आय वुईल फाइंड यू"
या चित्रपटांत क्लार्क गॅबल
आणि चित्रतारका लाना टर्नर



**~के. टी. देशमुख**

**स्पेन्सर** ट्रेसी आणि क्लार्क गॅबल हे दोघे कलावंत 'बूमटाऊन' आणि 'टेस्ट पायलट' ह्या चित्रपटांत एकत्र आले ते जणूं काय एकमेकांचे जिगर दोस्त बनण्यासाठींच! सुमारें पंचवीस वर्षांपूर्वीची हकीकत आहे. चित्ररसिकांनीं आपला 'सर्वांत आवडता चित्रतारा' म्हणून क्लार्क गॅबलची 'किंग' अशी एकमुखी निवड केल्याची वातमी मेट्रो गोल्डविन मेअर स्टुडिओंत येऊन थडकल्यावर स्पेन्सर ट्रेसी तावडतोब कपडे-पट विभागांत गेला आणि त्यानें एक पुठ्ठयाचा शानदार मुकुट पैदा केला. कांहीं निवडक मंडळींच्या समवेत त्यानें तो मुकुट आपल्या हातानें क्लार्क गॅबलच्या मस्तकावर ठेऊन तो 'राजा' झाल्याचें घोषित केलें. या उत्स्फूर्त छोटयाशा गोड समारंभानंतर उपस्थितांना कॉफी पाजण्यांत आली, केक्स वांटण्यात आल्या!

वास्तविक ही 'राजा' अशी उपाधि गॅबलला एक वर्षापुरतीच चिकटणार होती. परंतु सर्वांशीं सहानुभूतीची प्रेमळ वर्तणूक, दिलदार मनमोकळा स्वभाव, तडफदार व्यक्तिमत्व आणि असामान्य अभिनय कौशल्यामुळें किरकोळ नोकराचाकरापासून स्टुडिओचे मालक एल्. बी. मेअरपर्यंत सारे त्याला 'मिस्टर किंग' असें कायमचेंच संबोधूं लागले!

'क्लार्क गॅबल' हें नांव उच्चारतांच आपल्या कलाविलासानें मुग्ध करणाऱ्या त्याच्या महान् चित्रपटांची एक तेजस्वी चित्रमालिका क्षणांत पेटणाऱ्या विजेच्या जाहिरातीप्रमाणें डोळयांसमोर येते!

**चित्रपट कलाकार गॅबलचें आयुष्य म्हणजे एक महान चित्रपटच! शेतकऱ्याचा मुलगा, रबर कारखान्यांतला एक मजुर, तेलाच्या खाणींतील एक कामगार, सिनेमा कंपनीच्या दाराशीं 'एक्स्ट्रॉ' म्हणून धरणें धरणारा 'गॅबल' अखेर सिनेसृष्टीचा राजा झाला! लोक त्याला म्हणूं लागले "मिस्टर किंग"—त्याचीच ही जीवन कथा!!**

'म्युटिनी ऑन् दी बाऊन्टी', 'टेस्ट पायलट', 'गॉअन वुइथ दि वुईंड', 'मोगॅम्बो', 'टिचर्स पेट्' आणि अगदीं अलीकडील, शेवटचें, 'मिस्‌फिट्स्'!

आयुष्याची साठी गांठली तरी अभिनयांतील उत्साही धडाडी, खेळकरपणा आणि बेछूटपणाची डौलदार चमक कायम टिकवून धरणारा हा लौकिकवान अभिनेता! चित्रपटसृष्टींत मिळालेलें मानाचें आणि महत्त्वाचें 'राजेपदाचें' अग्रस्थान कायमचें टिकवून त्यानें चित्रपटव्यवसायास नव्हे तर पर्यायानें आपल्या राष्ट्रास प्रतिष्ठा मिळवून दिली! राजकारणी थोर पुरुषांचा पगडा जनमनावर असतो त्याचप्रमाणें अद्वितीय अशा प्रतिभाशाली कलावंतांचेंसुद्धां जनतेच्या हृदयावर साम्राज्य असूं शकतें इतकेंच नव्हे तर वेगवेगळ्या अनेक राष्ट्रांतील रसिकांच्या हृदयसिंहा-





अनुक्रमणिका

सनावर त्यांचें अधिराज्य वर्षानुवर्षे सतत चालूं असतें !

पद्मभूषण नटसम्राट बालगंधर्व ह्यांच्या मुंबईमधील अमृतमहोत्सव सुप्रसंगीं भारताचे संरक्षण मंत्री श्री. यशवंतरावजी चव्हाण यांनीं म्हटल्याप्रमाणें, भाषा, जात-पात, देश ह्या सगळ्या भिंती मोडून कलावंत हा एक वेगळें 'नवें जग' निर्माण करीत असतो !

☆ ☆

**वुइल्यिअम** क्लार्क गॅबल हा अमेरिकेंतल्या कॅडिझ् गांवच्या एका गरीब श्रमिक शेतकऱ्याचा मुलगा. लहानपणींच त्याची आई वारली. वापानें पुन्हां लग्न केलें. लहानग्या गॅबलला त्याच्या नव्या ओईनें अतिशय प्रेमानें वाढविलें. मोठेपणीं त्याचा स्वभाव इतका समाधानी आणि मनमोकळा होण्यास बालपणीं त्याच्या सावत्र आईनें केलेले संस्कारच कारणीभूत आहेत. हायस्कूलपर्यंतचें शिक्षण जेमतेम संपतांच त्याच्या वापानें त्याला ओहिओमधील ॲक्रॉन गांवीं रबराच्या कारखान्यांत मजूर म्हणून चिकटवून टाकलें. त्या गांवीं एक हौशी नाट्यसंघ चालू होता. फावल्या वेळीं गॅबल तेथें जाऊन रमूं लागला. वारिकसारिक भूमिका त्याच्या वांट्यासहि येऊं लागल्या. भेटीसाठीं आलेला वाप त्याला शोधून दमल्यावर स्वारीची गांठ थेटरांत पडली ! त्याचें हें लक्षण ठीक न वाटल्यानें वापानें त्याची तेथून उचलबांगडी केली आणि ओल्कोहोमा येथील पेट्रोल तेलाच्या प्रचंड कारखान्यांत भरती करून टाकली. नाटकांत कामें करून 'वर' येण्याची इच्छा करणारा गॅबल पृथ्वीच्या पोटांत 'खोल' जाऊन तेल उपसूं लागला !

रंगदेवता त्याच्यावर सुप्रसन्न होणार होती म्हणून कीं काय तिथें 'ज्युएल प्लेअर्स' या नाटक मंडळीचा मुक्काम पडला. तिचा एकहि नाट्यप्रयोग त्यानें चुकविला नाहीं ! रंगभूमीविषयीं त्याला विलक्षण ओढ वाटूं लागली. दिवसा तेलाच्या कारखान्यांत काम करतांना हातातोंडाला तेलाचे काळेकुट्ट डाग पडून जी रंगरंगोटी होई त्यामुळें रंगभूमीवर काम करतांना 'ग्रीजपेंट' चेहऱ्यावर थापावा लागून जी 'रंगसाधना' करावी लागते तिची आठवण होऊन गॅबल अस्वस्थ होत राही !

शेवटीं रंगभूमीवद्दलचें आकर्षण प्रभावी ठरून मुक्काम हलवितांना कंपनीनें गॅबललाहि तेथून गुपचूप हलविलें !

'ज्युएल प्लेअर्स' मध्यें सामील झाल्यानंतर तो गांवोगांव फिरूं लागला खरा परंतु पुरेशा उत्पन्नाच्या अभावीं ती संस्था वंद पडली. कांहीं दिवस किरकोळ वस्तूंचा मालविक्रेता वनून गॅबल कशीवशी गुजराण करूं लागला. कलाक्षेत्राशिवाय जीवन व्यर्थ असें वाटून शरीरावरोवरच मनाचीसुद्धां उपासमार होऊं लागली. तोंच हॉलिवूडमधील चंदेरी दुनियेच्या मोहमयी कथा ऐकून त्यानें तिकडे धांव घेण्याचें ठरविलें. जवळ पैसा नसल्यानें मालगाडीच्या डब्यांत रात्रींचा प्रवास करीत तो लॉस एंजेल्सला येऊन दाखल झाला !

चित्रपटसृष्टीचा एकच दरवाजा नवख्या कलावंताला उघडा असतो तो म्हणजे 'एक्स्ट्रा' मंडळींचा फड ! अनेक खटपटी लटपटी करून गॅबल या फडांत सामील झाला. रोजच्या हजेरीच्या वेळीं, वेगवेगळ्या वोलपटांत 'एक्स्ट्रा' कलावंतांची जरूर असेल त्याप्रमाणें निवड केली जाई. गॅबलनें अशा प्रकारें अनेक वोलपटांत अत्यंत किरकोळ कामें करण्यास सुरुवात केली. त्यावेळीं स्टुडिओचें अंतरंग, शूटिंग करण्याची एकंदर पद्धति, चित्रतारे, चित्रतारका आणि दिग्दर्शक असा हा एकंदर मामला त्याला अगदीं जवळून पहावयास मिळाला. डी. डब्ल्यू. ग्रिफीथ आणि अर्न्स्ट ल्यूबिश ह्या ख्यातनाम दिग्दर्शकांच्या चित्रपटांत अनेक वेळीं 'एक्स्ट्रा' म्हणून भरती होण्याची संधि आपणांस लाभली म्हणून तो स्वतःला धन्य समजूं लागला. एक अग्रगण्य कर्तबगार कलाकार म्हणून आपण हीच चित्रपटसृष्टि भूषविणार आहोंत याची पुसटहि कल्पना त्याला किंवा त्याच्या या दिग्दर्शकांना त्यावेळीं आली नाहीं !

चित्रपट सृष्टींत 'नट' किंवा 'नटी' यांची भरती मात्र रंगभूमीवरून होई आणि त्यांच्यामधूनच उद्यांचे चित्रतारे आणि चित्रतारका उदय पावत असतात ही परंपरा गॅबलच्या तीक्ष्ण नजरेस आल्यावरोवर 'एक्स्ट्रा' कलावंतांचा जथा तत्काळ सोडून तो न्यूयॉर्कला गेला. ब्रॉडवे रंगमंदिरांतून एका गाजलेल्या नाटकांत त्याची भूमिका विशेष वाखाणण्यासाठीं झाल्यावरोवर हॉलिवूडनें त्याला पाचारण केलें आणि 'पेंटेड डेझर्ट' (१९३१) या चित्रपटांत त्याला खलनायकाची भूमिका देण्यांत आली. त्याचवेळीं 'डान्स, फूल्स डान्स !' या चित्रांत त्याला जोन क्रॉफर्ड ह्या विख्यात अभिनेत्रीवरोवर काम करण्याची संधि मिळाली. त्यानंतरच्या 'ए फ्री सोल' या चित्रपटांत सौंदर्यशालिनी नॉर्मा शिअरर आणि क्लार्क गॅबल नायक नायिका म्हणून वरोवर एकत्र आले. गॅबलची नायकाची भूमिका इतकी सुरेख वठली कीं त्याचा या चित्रपटापासून 'चित्रतारा' म्हणून उदय झाला असें मानतात. परंतु त्याच्या लोकप्रियतेनें उंच अशी भरारी मारली ती 'रेड डस्ट' (१९३२) या चित्रपटामधील नायकाच्या भूमिकेनें ! 'वॉक्स ऑफिसचें आकर्षण नंवर एक' अशी ख्याति मिळविलेली 'जीन हॅर्लो' या चित्रतारकेनें आपल्या मादक म्हणून मोहक सौंदर्यानें आणि छटेल अभिनयानें अलीकडच्या 'मेरिलिन मन्रो' सारखी अफाट लोकप्रियता त्यावेळीं मिळविली होती ! अशा अभिनयचतुर नायिकेवरोवर काम करतांना क्लार्क गॅबलनें आपल्या रंगेल, रंगेल आणि दमदार अभिनयानें तिला निस्तेज करून टाकलें. "रेड डस्ट" या चित्रपटापासून 'मातवर' अशा चित्रताऱ्यांच्या प्रभावळींत क्लार्क गॅबलचें नांव गोंवण्यांत झालें ! परंतु या प्रभावळींत त्यानें अग्रस्थान मिळविलें. 'ईट हॅपन्ड वन् नाईट !' (१९३४) या चित्रपटानें ! ह्या पहिल्या सामाजिक विनोदी वोलपटामधील त्याच्या नायकाच्या भूमिकेस त्या वर्षीचें सर्वोत्कृष्ट अभिनयाचे 'ऑस्कर' पारितोषिक मिळालें ! 'म्यूटिनी ऑन दी वाऊन्टी' (१९३५) या गाजलेल्या चित्रपटांत चार्लस् लॉटन ह्या मुरब्बी, महान



अनुक्रमणिका






कलाकारांबरोबर सामना देतांना त्याच्या साहसंयुक्त पराक्रमी अभिनयाची कसोटीच लागली गेली ! नायक खलनायकाच्या अभिनय शर्यतीची अशी अपूर्व लढत पडद्यावर त्यानंतर पुन्हा क्वचितच दिसली ! अनेक चित्रतारे आणि चित्रतारका यांनीं नटलेल्या 'गॉन वुइथ् द वुईंड !' (१९३९) ह्या सप्तरंगी चित्रानें अपूर्व यश मिळविलें ! कलावंतांची इतकी भाऊगर्दी असूनहि क्लार्क गॅबलची भूमिका इतकी उठावदार झाली कीं 'चित्रपट सृष्टीमधील एक अमर भूमिका' म्हणून तिचा नेहमीं गौरवानें उल्लेख करतात. 'ऱ्हेट बटलर' या पात्रास पडद्यावर साकार करण्याकरितांच गॅबलचा जन्म झाला होता असाहि उल्लेख नेहमीं केला जातो. अगोदर ही भूमिका 'गॅरी कूपर' या प्रख्यात अभिनेत्यास देऊं करण्यांत आली होती परंतु ती वास्तविकरित्या उभी करणें आपल्या आंवाक्याबाहेर आहे असें सांगून त्यानें नकार दिला. प्रेमप्रकरणीं फार मोठा साहसी, निर्विकार बेपर्वाईनें बेछूट जीवन जगणारा ऱ्हेट बटलर हा एक इरसाल टग्या होता ! कथा प्रसंगांतील घटना खरोखरीच घडत गेल्या आणि त्यांचें चित्रीकरण होत राहिलें असें वाटावें इतक्या वास्तवतेनें क्लार्क गॅबलनें ही भूमिका पडद्यावर रंगवून दाखविली होती ! **"व्हिव्हीअन ले"** या नामवंत चित्रतारकेनें त्याच्या लावण्यवती प्रेयसीची भूमिका उत्कृष्ट वठविली होती.

* * *

आपल्या कलाजीवनामध्यें क्लार्क गॅबलनें अपार यश मिळविलें. त्याच्या भूमिका पडद्यावर पहात असतांना साऱ्या जगामधील लाखों चित्ररसिक निहायत खूष असत ! माझा एक अनुभव म्हणून सांगावेसें वाटतें कीं, इंग्रजी चित्रपट प्रकाशित करणारीं म्हणून जेवढीं चित्रपटगृहें आपल्या भारतांत पाहिलीं त्या सर्व गृहांत, बाल्कनीवर जाणाऱ्या जिन्यांत क्लार्क गॅबलचें भव्य आकाराचें चित्र असलेली फ्रेम मला आढळली !

पण तो एका मुलाखतींत पत्रकारांना विनोदानें म्हणतो, 'कॅमेऱ्यासमोर उभा राहून मी माझा चेहेरा विक्षिप्तपणानें वेडावांकडा करीत माझें संवाद म्हणतो. प्रेक्षक माझ्या अभिनयावर एवढे कां खूप होतात हें कोडें मला कधींच उलगडत नाहीं !'

बुद्धिमत्ता, अभिनयचातुर्य आणि सतत परिश्रम करण्याच्या त्याच्या वृत्तीमुळेंच त्याची प्रमुख भूमिका असणारे चित्रपट इतके यशस्वी झाले! मेट्रो गोल्डविन मेयर या मान्यवर चित्रसंस्थेनें या चित्रपटांवर कोटयवधि डॉलर्सचें उत्पन्न घेतलें. सुरुवातीपासून अखेरपर्यंत तो या संस्थेचा एकनिष्ठ असा पगारी नट होता. आठवड्याचा पगार, म्हणून शेवटीं त्याला सुमारें 'दहा हजार' डॉलर्स मिळत असत. परंतु यशामुळें अगर संपत्तीमुळें आपलें डोकें फिरून जाऊं नये म्हणून त्यानें एक युक्ति योजिली होती. एक वेळेस आपण एक सामान्य 'एक्स्ट्रा' होतो याची जाणीव कायम रहावी म्हणून रंगपटांत आपल्या आरशाच्या टेबलाच्या खणांत त्यानें आपला त्या वेळचा एक फोटोग्राफ ठेवला होता आणि त्यावर स्वतःला जरबेनें उद्देशून लिहिलेल्या दोन ओळींचा उपदेश वाचल्यानंतरच तो 'सेट' वर जात असे! आपणांकडे आज जरी राजेपद आलें असलें तरी आपण मुळचे 'शागीर्द' 'बनचुके' बनून परिश्रम करण्यांत कुचराई केली तर आपलें आसन आपण गमावून बसूं ही जाणीव तो अहर्निश बाळगीत, आपल्या व्यवसायाशीं प्रामाणिक राहून आणि आपल्या व्यवसायावर नितांत श्रद्धायुक्त प्रेम ठेवून तो परिश्रमांची शिकस्त करीत असे!

ग्रेटा गार्बो, नॉर्मा शिअरर, जोन क्रॉफर्ड, व्हिव्हिअन ले, क्लॉडेट् कोल्बर्ट, आव्हा गार्डनर, डोरीस डे, ग्रेस केली, ग्रीअर गार्सन, आणि मेरिलीन मन्रो अशा अलौकिक कीर्तीच्या सौंदर्यवती चित्रतारकांच्या बरोबर नायकांच्या भूमिका कित्येक चित्रपटांत गॅबलनें मोठ्या बहारीनें वठविल्या!

अचाट प्रसिद्धी, अमाप पैसा आणि तुफानी लोकप्रियता मिळविलेल्या या प्रेमवीरानें आयुष्यांत पांच वेळेस केलेले विवाह आणि प्रत्येक विवाहाच्या अगोदरचीं त्याचीं प्रेमप्रकरणें हा एक सतत कौतुकाचा विषय होऊन बसला होता. कांहीं ग्रंथ प्रकाशकांनीं तर त्यानें आपलें आत्मचरित्र लिहून आपण तें प्रसिद्ध करावें म्हणून त्याचेकडे कित्येकदां धरणें धरून बसावें आणि कोरा चेक देऊन त्यानें हवी ती





अनुक्रमणिका

रक्कम लिहावी असा आग्रह करावा. संपत्तीच्या या प्रलोभनाला बळी न पडतां, आपल्या आयुष्यांतील रम्य आठवणी हा एक केवळ स्वतःच्या स्मृतींतील अमोल ठेवा आहे असें सांगून तो त्यांना वाटेला लावी !

पहिल्या दोन अयशस्वी विवाहानंतर त्याचा विवाह 'कॅरोल लोम्बार्ड' या प्रसिद्ध चित्रतारखेशीं झाला. ती सुरेख होती, बुद्धिमान होती, संवादचतुर होती, विनोदी आणि खट्याळहि होती. संसारांत गंमत यावयास आणखी काय पाहिजे ? रानावनांतून चौफेर घोडा उधळीत जाणें, शिकार करणें, मासे पकडणें आणि मोटारींतून खूप वेगानें सहलीस जाणें हे त्याचे आवडते छंद होते. तिलाहि मोकळें वातावरण खूप मानवत असें. त्याच्या प्रत्येक सहलींत कॅरोल त्याच्यावरोबर राहून त्याचें मन आनंदी करीत असे, ती त्याची केवळ पत्नीच नव्हती तर उत्तम मैत्रिण होती.

दुसरें महायुद्ध सुरूं झाल्यावर 'अमेरिकेचे राष्ट्रीय युद्ध रोखे' खपविण्याच्या मोहिमेवर कॅरोल गेली होती. लाखों डॉलर्सचे रोखे तिनें खपविले. ज्या विमानानें ती प्रवास करीत होती तें विमान यांत्रिक बिघाडानें अचानक खालीं कोसळून कॅरोलला अपघाती मृत्यु आला. तिच्या सहवासांतील तीन वर्षे हा त्याच्या आयुष्यांतील सुखाचा परमोच्च विन्दु होता. तिचा मृत्यु हा त्याला एक अनपेक्षित असह्य असा प्रहार ठरला ! एकलकोंडेपणानें, उदास मनानें तो वेळ घालवूं लागला. मग एके दिवशीं सरळ फौजेंत दाखल झाला. साध्या शिपाईगिरीपासूनचें शिक्षण घेत घेत तो मेजरच्या हुद्यापर्यंत चढला. युद्धांत त्यानें प्रशंसनीय अशी कामगिरी केली ! दोस्त राष्ट्रें विजयी झालीं आणि विजयी सेना आपापल्या स्थळीं परतल्या.

गेबल हॉलीवूडला परत आल्यानंतर त्यानें पुन्हां चित्रपटांत भूमिका करण्यास आरंभ केला. त्याच वेळेस गॅबलचा चौथा विवाह कॅरोल लोम्बार्डसारख्या दिसणाऱ्या लेडी अॅशले या सधन आणि सरदार कुटुंबांतल्या स्त्रीशीं झाला. कॅरोलसारखी दिसते म्हणजे कॅरोल नव्हे असा उलगडा झाल्यानंतर घटस्फोट घेण्यांत आला. शेवटचा म्हणजे पांचवा विवाह कॅथलिन विल्यिअम्स—आतां सौ. के. गॅबल—या सौम्य शांत आणि धिम्या प्रकृतीच्या स्त्रीबरोबर झाला. गॅबलच्या घरीं येतांना तिनें आपलीं पहिलीं दोन अपत्यें बरोबर आणलीं त्यांना क्लार्क गॅबलनें मोठ्या प्रेमानें वागविलें. पुन्हां एकदां त्याच्या आयुष्यांत सुख समाधान आणि शांति यांचें युग सुरूं झालें !

के. गॅबल त्याच्या आवडीनिवडीकडे बारकाईनें लक्ष देत असे. अधून मधून स्टुडिओंत चित्रिकरणाचें वेळींहि हजर राही. परंतु गॅबलच्या व्यवसायविषयक गोष्टींत ढवळाढवळ करणें तिला मान्य नव्हतें. एका बाजूस शान्त चित्तानें विणीत बसलेल्या के. बाईंना पाहिलें कीं गॅबलच्या चित्तवृत्ति प्रसन्न होत ! 'किंग अँड फोअर क्वीन्स' या चित्रपटांत

> **'भावार्थ'**
>
> **भाव तैसा देव । म्हणे संत कोणी**
> **शा मुळजी वाणी । बोले कैसा ।।**
> **'वाढविता भाव । लक्ष्मी हो प्रसन्न**
> **सत्य संतवचन । पुरेपूर ।।'**
>
> **—'आंदर्टी'**

प्रमुख भूमिका करणारी बारबॅरा निकोलस चित्रसृष्टींत अनभिज्ञ आणि नवथर असल्यामुळें गॅबलसारख्या एका प्रथितयश नायकाबरोबर काम करतांना खूप गांगरून गेली. सेटवर एका बाजूस नेऊन गॅबलनें तिला चित्रिकरणाचा प्रसंग नीट समजावून सांगितला आणि त्यामध्यें नायिकेनें कोणते भावनाविष्कार दाखवायाचे आहेत याची मनमोकळेपणानें तिच्याशीं चर्चा केली. इष्ट तो अभिनय, परिणामकारक हालचाली कशा असाव्यात याची तिला नीट कल्पना आल्यावर तिच्या मनांतील भीतीचें ओझें कुठल्या कुठें नाहींसें झालें ! सोबतच्या छायाचित्रांत ते दोघे नृत्य करतांना दिसत आहेत. बारबॅरा त्याचेकडे एकटक प्रेमभरानें बघत असून गॅबलच्या चेहेऱ्यावर आत्मविश्वासानें येणारी हालचालींतील डौलदार सफाई आणि त्याची भूमिकेंत दंग होऊन गेल्याची बेहोशी स्पष्ट दिसत आहे.

ह्या प्रसंगाचें चित्रिकरण आटोपल्यावर गॅबलच्या अभिनयगुणांमुळें भारावून गेलेली बारबॅरा, के. गॅबलजवळ जाऊन बसली आणि तिला म्हणाली, 'मला किंग गॅबल-इतका सुरेख साहसी पण प्रेमळ असा नवरा कसा हो मिळेल ?'

नाट्याचार्य खाडिलकर यांच्या 'स्वयंवर' नाटकांतील रुक्मिणी म्हणते, 'रुक्मिणी-इतकी सुंदर बायको जर श्रीकृष्णांना पाहिजे असली तर रुक्मिणीशींच त्यांनीं लग्न केलें पाहिजे !'

के. गॅबलनें बारबॅराला दिलेलें उत्तर याच चालीवर होतें. त्या म्हणाल्या, 'तुला गॅबल-इतका सुरेख नवरा हवा असेल तर गॅबलशींच लग्न केलें पाहिजे ! पण आतां तें शक्य नाहीं ! कारण तो मान मी पटकावला आहे!'

☆ ☆ ☆

क्लार्क गॅबलचें 'मिस्फिटस्' हें शेवटचें चित्र! कांहीं महिन्यांतच तो आपल्या वयाच्या साठाव्या वर्षांत पदार्पण करणार होता आणि चित्रपटांतील त्याची ही साठावीच भूमिका होती हा एक विचित्र योगायोग म्हटला पाहिजे. सौंदर्यसम्राज्ञी चित्रतारका मेरिलिन मन्रो ही या त्याच्या शेवटच्या चित्रपटाची नायिका! लोकप्रियतेच्या शिखरावर वास्तव्य करणारे हे दोन वेछूट वृत्तीचे दैदीप्यमान चित्रतारे नायकनायिका म्हणून प्रथमच एकत्र आले होते.

परंतु या चित्रकृतीस कांहीं शाप मिळाला होता कीं काय कोण जाणे! हा चित्रपट प्रकाशनाच्या वाटेवर असतांना क्लार्क गॅबल ह्या चित्रताऱ्याचें हृदयविकारानें आकस्मिक निधन झालें आणि सौंदर्यशालिनी मेरिलिन मन्रो हिनें पुढें आत्महत्या केली!

मेरिलिनचे पति सुप्रसिद्ध लेखक आर्थर मिलर यांनीं या चित्रपटाचे कथा संवाद लिहिले असून चित्रिकरणाचे वेळींहि ते हजर असत. नायकाचें तोंडीं त्यांनीं जीं कांहीं वाक्यें टाकलीं होतीं त्याप्रमाणें

( पान ५४ वर पहा )






[अनुक्रमणिका](#)






# भीष्माचा डोंगर

—श्रीराम कामत

**पूर्व कथासूत्र—**

**महामायेच्या देवळांतली आरास पाहण्यांत रंगलेल्या वासंतीची तेथलीं पोरें विटंबना आरंभतात. पण सावित्री तिला संरक्षण देते. कितीही झालं तरी ती दाजी नावराची लेक होती. पण मग तिला कळतं कीं, त्या लेकीनंच गुण उधळलेत. तिच्या श्रद्धेला तडा जातो. आणि मग ती तिरीमिरींतच वासंतीला भिडली. तिनें वासंतीच्या थोबाडींत मारल्या — वासंती मार खात राहिली मुकाटयानें !**

**—द्वारकानाथ कुळकर्णीला ती सारें सांगते – तो लग्नाला होकार देतो. पण महामायेच्या देवळांत संरक्षण द्यायच्या ऐवजीं तो पळून जातो ही सल वासंतीला टोंचतच राहते — ती म्हणते "मी मरून जाईन तुझ्याशीं लग्न करण्यापेक्षां"——**

[श्रीराम कामत यांची 'भीष्माचा डोंगर" ही कादंबरी 'दीपावली'-तून क्रमशः प्रसिद्ध झाली. कादंबरी संबंधीं वाचकांनीं आपल्या प्रतिक्रिया कळवाव्या. त्यांना 'यथास्थल' प्रसिद्धि देण्यांत येईल—

—**संपादक**]

## [२६]

**ह्या** लिलांवाकडे उभं गांव डोळे लावून होतं. गेले कित्येक दिवस गांवांत दुसरा विषय नव्हता. एक हाच–दाजी नावराच्या जमिनीचा लिलांव. त्या धर्मानं लोक दाजीची कींव करीत. इतर बामणांनी नाही आपला वरोवर फायदा करून घेतला. ह्या नालायकाला स्वतःचं हित कळत नाहीं तर कोण काय करणार, म्हणून हळहळत. फुकट–फुकट मरणार आहे हा—आपल्याच कर्मानं. आणि वाईट म्हणजे हें मेलातरी ह्याला कळणार नाहीं – गांव काळजी करी.

खरं होतं ! खुद्द दाजी नावराला सुखदुःख नव्हतं.

उगाच नाहीं, वाटभर ह्याची गर्जना चालली होती. कोणी दिसला कीं ह्यानं म्हणावं, अरे चल चावडीवर. लिलांव आहे माझ्या जमिनीचा. तुमची मदत नको रे दाजीला ! पण भांचोद गंमत वघायला तर याल का नाहीं ?"

"काय आहे हो दाजी !" लोक निमित्त काढत.

"राहूं दे काम."

"आन् खाऊं काय दाजीनूं ?" लोक विचारीत.

"खा मला, भांचोद, आजच हा प्रश्न पडला होय रे ? ह्यापूर्वी कामं नव्हतीं. कधीं करीत तरी होतां ? खुशाल चकाट्या पिटीत वसायचेत. आणि तरी खाण्याचे कधीं वांधे नाहीं पडले."

"दाजी, तेव्हांची परिस्थिति वदलली नाहीं हो आतां ?"

"होय ? वदलली. कंपनी आली आणि तसं सगळंच वदललं. भांचोद, पहिलीं माणसं सुद्धां. आतां कामं नाहीत, धंदा सुरू केलात रे ! हरामीचा, लुवाडण्याचा, पैसे खाण्याचा. तेव्हा आतां सवड नाहीच व्हायची तुम्हाला.•वरोवर आहे !" दाजीनं वैतागानं कवूल करावं.

हां नाहीं, हूं नाहीं लोक मुकाट पुढं सटकत.

आणि मग दाजी नावराला एकट्यालाच वाटेनं बडवडत जावं लागत होतं.

वर रानांत एव्हाना खाणी सुरू झाल्या होत्या. हजारों लोक वावरत होते. मुंग्यासारखीं, किड्यांसारखीं. अंगावर माती, तोंडांत माती, श्वासोश्वासांत माती. दगडं न् माती आणि हीं माणसं—परतं काही नव्हतंच. वघूनच अंगावर कांटा यावा, शिसारी यावी असं हें दृश्य ! मँगनीजची धूळ फुफ्फुसांत सांठली कीं वर्षभरांत क्षय – नक्की ! दाजीला शंका नव्हती. आणि मग ह्या लोकांना कोणी वघायचं ? कंपनीला कारण नव्हतं. ती पगार देत होती. पगार—होय ! आणि ह्या लोकांना फक्त तोच दिसत होता. पुढचं दिसत नव्हतं. खणा, ठेवा खणून हे खड्डे. आपापले, आपल्याच हातांनी. आणि उद्यां पोरावाळांसाठीं सुद्धां ! बिल्कुल मसनवट करून टाका या भीष्माची !

विपण्ण मनानं दाजी वघत उभा होता. काळजांत काजळी धरलेली. डोळे गढूळ, भरलेले.

वाजूच्या चहाच्या खोपटांतून गलका करीत सात आठ पोरं वाहेर पडलीं. सिगारेटी फुंकत, अच्यावच्या वडवडत, पाच्पाच् पान थुंकत.

एका कार्ट्यानं ह्या दाजी नावराला पाहिला. आणि म्हटलं, "हें खुळं निघालं रे—"

खुशाली हंसत बोलला, "अरे नुसतं खुळं नाहीं. शहाणं खुळं—"

वाकीच्यांना त्यानं डोळा घातला. आवाज चढवून झॅकींत विचारलं, "दाजी कुठं ? चावडीवर ?"

"होय, लिलांवाला." जाव केला आणि मग दाजीनं ह्या पोरांकडे पाहिलं. होतीं गावांतलींच. त्याला ओळख पटली. आणि तो हंसला, "येणार काय रे ?"







"छाः ! जावा तुम्हीच ! आम्ही वसतों वाट वघत. तो काय ट्रॅक्टर तयार करून ठेवून दिलाय्. तिकडे लिलांव झाला रे झाला का इथं हा घुसवलाच बघा. तुमच्या जमिनींत. दणका लावायचा. तासाभरांत बिल्कुल साफ – होत्याचं नव्हतं ! तुमचीं तीं कलमं, सावल्या – काजूचीं झाड, निवडुंगाचीं फडं आणि वाकी झुडपं जाळी सगळं साफ सपाट करूं ! दोपारला येऊन तरी बघा. तुम्हाला पण नाहीं ओळखतां येणार. पैज आपली–" खुशाली बोलला.

"तसं नाहीं होणार पोरांनो !" हा दाजी.

"तसंच होणार !" हीं पोरं.

"ट्रॅक्टर दाजीच्या अंगावरून न्यावा लागेल म्हणावं."

"तसं पण होईल !" पोरं ओरडलीं. "आतां तुमचा आग्रह, तर काय करणार ?" आणि फिदी फिदी हंसत सुटलीं.

आश्चर्य ! दाजी नावर उसळला नाहीं, खवळला नाहीं. त्याला फक्त वाईट वाटलं, दुःख झालं. गांवांत हीं पोरंसुद्धां त्याची टिंगल करूं लागलीं होतीं.....

चावडीकडे आला आणि बाहेर फाटकावर त्याला गर्दी दिसली. वाटलं लिलांवाला लोक जमलेत. आणि जरा वरं वाटलं. अवसान आलं.

पण हेंसुद्धां सुख त्याला मिळावयाचं नव्हतं. म्हणूनच पोलीसपाटील धर्म्या रुन्याला घेऊन चावडीवरून वाहेर पडला. बरोबर दोन पोलीस होते. धर्म्याच्या हातांत बेडया होत्या.

पुढं पुढं करणाऱ्या लोकांना पोलीसपाटील ओरडला, "अरे चल, वाट द्या ! फुकट कशाला गर्दी करता ?"

धर्म्या म्हणाला, "फुकट नाहीं. धर्म्याला वघायला जमलेत लोक."

आणि तसं दाजी नावराचं लक्ष गेलं. "धर्म्या तूं ? आणि हें काय बाबा–काय केलंस ?"

"खून. खाणीवरच्या त्या शीख मेस्ताचा–जीवनसिंगाचा. घातलान् दगड डोचक्यावर." गर्दीतील एकानं खुलासा केला.

"शिरोड्याला कोठडींत पोंचवून येतों याला." पोलीसपाटलानं सांगितलं.

आणि धर्म्या बोलला, "अरे कारण विचारा कीं– दाजी; माझ्या शकूचा जीव ह्याच राक्षसानं घेतला हो–"

पोलीसपाटील त्याला दमदाटी करूं लागला, "गप्प ! बोलायचं काम नाहीं."

धर्म्या रुन्ने थोडाच भीक घालतो ? त्यानं आवाज आणीकच चढवला, "म्हणजे वरेच दिवस आश्चर्य करतों आहे. अजब झालं होतं. ह्या धर्म्याला भिणारा प्राणी उभ्या दुनियेंत कोणी आहे काय रे? भ्यायचं मीच–प्रत्येकाला, सगळ्यांनाच. पण कंपनीचा हा दाढीवाला मेस्त मला डरायचा, मी समोर दिसलों कीं ह्यानं पाठ फिरवावी, माझा आवाज ऐकला कीं ह्याचं थोबाड वंद. माझ्या डोळ्याला डोळा देऊं नये, शेपूट घालावं. हाः हाः ! आं ! गेले तीन महिने ही अशी गंमत चालली होती. आणि मी पण गाढव असा, आपला बुचकळ्यांत पडलों होतों. तर काल एकदम उलगडा झाला. वस्त्यांवची दारू बाकी झॅक ! पिऊन रातला रस्त्यांत पडलों होतों तर हा



साक्षात्कार ! मग नाहीं वा विचार केला. उठलों आणि त्या दाढीवाल्याचा ठावठिकाणा काढला शोधून. मेस्त पडला होता रामप्पाच्या खोपटांत, वाहेर खाटल्यावर. मी काय फुरसद केली आहे म्हणतां? उचलला एक मोठा धोंडा, हाणला ह्याच्या टाळक्यांत. तसाच धांवलों चावडीवर वर्दी द्यायला...."

दंडुक्यानें पोलीसपाटलानं धर्म्याला पुढं लोटलं. मग गर्दीला समज दिली, "अरे काय ऐकतां ह्या अर्धवटाचं. पोर गेल्यापासून ह्याचं डोकंसुद्धां साफ गेलं आहे. दारू पितो आणि वसतो वरळत काय वाटेल तें. ह्याच्या वायकोनंच जबानींत पोलिसांना सांगितलं आहे रात्रभर हा घरलाच होता. कोंडून ठेवला होता सावित्रीनंच...."

"खोटं, बिल्कुल खोटं ! मी सुटावं म्हणून हीं सगळीं खोटं बोलताहेत, दाजी–" आपल्यावर चाललेल्या ह्या अन्यायानं धर्म्या चवताळला, "फासाला नाहीं भीत मी. माझं कार्य झालं ! रामराम मंडळी ! कलमांना मात्र वेळेवर पाणी घाला हां दाजी–ती एकच काळजी..."

पाठींत दोन गुद्दे वसले तसा धर्म्या निमूट चालूं लागला. लोकंसुद्धां त्याच्या मागून निघालीं. आणि तशी चावडी ओस पडली.

फक्त सात आठ माणसंच होतीं चावडीवर. दाजीचा थोरला भाऊ बाळचा नावर आणि पुतण्या वंड्या, भाऊ कुळकर्णी, लिलांव करणारा इसम, कंपनीचा वकील आणि इतर दोन-चार माणसं. दाजी ह्यांना ओळखत नव्हता. गोळेसाहेब हजर नव्हता. आणि अण्णागुरुजीचासुद्धां कुठं पत्ता नव्हता.








"तुमच्यापासूनच खोटी दाजी," लिलांव करणारा माणूस बोलला, "करतों सुरुवात–"

"हो. आटप एकदां. उत्सुकता नाहीं दिसत कोणाला." दाजीनं म्हटलं.

लिलांव बोलणारा तपशीलाचीं कागदपत्रं काढूं लागला.

इतक्यांत दाजीला मागुन कोणीसं विचारलं, "आपणच दाजी नावर."

"होय ! कोण आपण ?" दाजीनं उलट प्रश्न केला.

हा गृहस्थ गांवांत नवीन दिसत होता. बरा प्रतिष्ठित पैसेवाला असावा. चेहराच सांगत होता. आणि आवाजसुद्धां उर्मट नव्हता.

"मी देवगडचा. सामन्त अँड कंपनीचा मालक बाबूराव सामन्त. व्यवसाय बागायतीचा विशेष करून कलमी आंब्यांचा." आपला परिचय करून देताना हा गृहस्थ रसाळ हंसला. तसे पुढचे दोन सोन्याचे दांत चमकले. "रत्नागिरीला ही लिलांवाची बातमी कळली. तुमचीसुद्धां बरीच माहिती मिळाली. म्हटलं चक्कर मारावी. जमलं तर–"

"देवगड ? म्हणजे प्रत्यक्ष देवानंच धाडलं म्हणा कीं !" दाजी खुष होऊन गेलेला, आणि मग ह्या दोघांच्या गोष्टी सुरू झाल्या जमिनीच्या, कलमाच्या, कंपनीच्या, गांवाच्या भवितव्याच्या. बोलत होता दाजीच. भडभडून, देहभान विसरून.

बाजूला लिलांववाल्यानं जमिनीचं तपशीलवार वर्णन लावलं होतं. भली लांबलचक जाहिरात चालवली होती. जमिनीचं क्षेत्रफळ, सर्व्हेनंबर, वहिवाट, पीकपाणी, उत्पन्न — चालूचं, उद्या वगैरे वगैरे. कांहीं खरं, बरंचसं खोटं, अतिशयोक्तीचं. जमिनीची किमान किंमत एक हजार रुपये असल्याचं त्यानं जाहीर केलं आणि मग पब्लिकला (होतं कोण ? फक्त सातआठ माणसंच) लिलांवात बोलण्याचं आवाहन केलं.

दाजी नावर बोलला, "दीड हजार"

कंपनीच्या वकिलानं लागलीच दोन हजार केले.

दोघांतच चढाओढ लागली. आंकडा धडाधड वाढत चालला. आभाळांत वरवर चढणाऱ्या पतंगासारखा.

दाजी नावरानं पांच हजार केले. तसा कंपनीचा वकील उसळला, "डॅम इट् ! हा काय व्यवहार झाला ? कसली बेकार जमीन. तीसुद्धां टीचभर. पांच हजार रुपये द्यायचे तिला. वेडेपणा आहे !"

थाळी वाजवून लिलांव करणारा पुकारूं लागला, "पांच हजार एकवार —"

दाजी त्वेषानं ओरडला, "वेडेच आम्ही ! म्हणून तर ह्या लिलांवांत पडलों. घरांतील एकूणएक चीजवस्तु घेऊन आलों आहोंत इथं — हा . . . हा डबा दागिन्यांचा. शिवाय आमची लाज राखायला हे बाबूराव सामन्त देवगडहून मुद्दाम धांवून आलेत"

सोन्याचे दांत दाखवीत बाबूराव मोठ्यानं हंसला.

"सहा हजार !" कंपनीचा प्रतिनिधि नाराजीनं बोलला. ही किंमत त्याला भयंकर वाटत होती.

दाजी नावर हा आंकडा चढवणार, तर आधींच बाबूराव सामन्तानं आवाज उठवला, "साडे सहा हजार —"

हंसून खालच्या आवाजांत तो दाजीला म्हणाला, "आता मला बोलूं द्या नावर —"

"पण — पण —" दाजी पुटपुटला. त्याला इर्षा चढलेली. माघार घेतांना बरं वाटेना.

सामन्तानं त्याला जाहीर आश्वासन दिलं, "नावर काळजी करूं नका. अखेरी आंकडा लिलांवांत माझाच राहील."

"साडे सहा हजार एक वार . . . साडे सहा हजार दोन वार..." लिलांव करणारा बोंबलत होता.

"बोलतां, पण इतकी रक्कम आहे का ?" बाळचा नावरानं शंका घेतली.

"चेक देतो. महाराष्ट्र बँकेला." बाबूराव अपमानानं डिवचला.

कंपनीचा वकील कुत्सितपणं बोलला, "तो वटेल याला काय पुरावा ?"

"हा बँक अकावन्ट — तपासा !" आपलं बँकबुक त्यानं वकिलाच्या तोंडावर फेकलं.

"साडे सहा हजार दोन वार — दोन वार साडे सहा हजार –" लिलांववाला ओरडतच होता. ह्याचं लक्ष आतां फक्त कंपनीच्या वकिलाकडे लागलं होतं.

आणि वकील बाबूराव सामन्ताचं बँकबुक चाळत होता. तें बंद करून त्यानं मालकाकडे भिरकावलं रागानंच. आपली बॅग बंद करून तो चरफडत उठला, उभा राहिला. हात उडवीत म्हणाला, "गाढवांच्या नादाला कोण लागणार ? कंपनीचं त्यांत हित नाहीं."










आणि हें बघून लिलांव करणारा ओरडला, साडेसहा हजार तीन वार...

थाळी वाजवून पुन्हां एकदां त्यानं जाहीर केलं, "साडे सहा हजार तीन वार—"

दाजी नावर हर्षातिरेकानं ओरडला, "सामन्त, जिंकलों आपण."

आणि मग बघतो तर कंपनीचा वकील आणि हा – हा बाबूराव सामन्त हस्तांदोलन करताहेत. दागिन्यांचा डबा उचलून दाजी तडक बाहेर पडला. अक्षरानंहि बोलला नाहीं.

त्याचा भाऊ आणि पुतण्या मात्र मागं ठणाणा करीत होते, "आपण बुडालाच. बरोबर आम्हांलाहि बुडवलं. साफ गळा कापला."

हंसत होता बाजूला भाऊ कुळकर्णी. किर्ट्या आवाजांत, चवीनं. "खुळाच खुळा! ह्या दाजीला कोणीहि बनवावं! ह्याला मात्र वाटतं आपणच शहाणा—"

* *

**शाळेच्या** दारांत उभं राहून दाजीनं विजयला साद घातली. खाकेंत कुबडी अडकवून विजय पुढं आला, "दाजी तुम्ही?" दागिन्यांचा डबा दाजीनं त्याच्या हातांत दिला. सांगितलं, जरा घरीं पोंचवा आमच्या. दागिने आहेत. बरं, येतों!"

आणि पाठ फिरवून हा निघालासुद्धां. आश्चर्यानं थक्क होऊन विजय आपला बघतोच आहे. तर ताड् ताड् टांगा टाकून रस्त्यावर दाजी नावर कुठच्याकुठं बेपत्ता. आला काय न् गेला काय? साद घालायला मुळीं अवसरच मिळाला नाहीं.

होय! दाजीला तशीच घाई होती. बिल्कुल सवड नव्हती. पाय नेतील तितक्या लवकर तो जात होता. धावत, पळत, उड्या टाकीत. फुटेल त्या वाटेनं. झाडाझुडुपांतून, काट्याकुट्यांतून, खाचा-खळग्यांतून–हा चालला होता. चालला होता. भीमाबर त्या डोंगरावर. कशाकशाकडेसुद्धां त्याचं लक्ष नव्हतं. दुसरा विचार नव्हता. पुरती शुद्ध नव्हती.

आतां ह्या वयांत नजिकचा मार्ग म्हणून सरळ कडा चढून हा म्हातारा भीष्माच्या माथ्यावर उभा ठाकला. विलक्षण दमला होता. श्वास लागला होता. हातापायांत गोळे आले होते. खमीस काढून दाजी घाम पुसूं लागला. हाश् हुश् करीत खालीं बसला.

आणि नेमकं त्याचं तिकडे लक्ष गेलं.

त्याची भीति खरी होती.

तिकडे समोर रस्त्यावर कंपनीची सगळी तयारी झाली होती. पताका लावून ट्रॅक्टर सजवला होता. मॅनेजर गोळेसाहेब स्वतः पेढे वाटत होता. अण्णागुरुजी काठी टेकत फुकट रुबाबांत मिरवीत होता. द्वारकानाथ कुळकर्णी लिलांवाची हकीकत मॅनेजरला सांगत पुढं पुढं करीत होता. कंपनीचे एकजात अधिकारी आणि कामगार चोहीकडून गर्दी करून होते.

बाजूला उखळींतून दारूचे बार सुरूं झाले. ड्रायव्हरनं ट्रॅक्टर सुरू केला. कडाड् धडाड् करीत तें अजस्त्र धूड चालू झालं.

खाणीवरच्या कांहीं पोरांना लहर आली. त्यांनी भजन सुरू केलं–

आम्ही वैकुंठवासी — आलों याच कारणासी

बोलले जे ऋषी — साच भावें वर्ताया—

घायाळ वाघासारखा चवताळून दाजी नावर उठला. उतारावरून तिरासारखा धांवत आला. आला तो पडलाच. एकदम आदळला पुढच्या मडगार्डला. आडवा खालीं. जमिनीवर आदळला. शुद्ध जाऊन निपचित पडला. आणि पुढच्याच क्षणीं सरळ ट्रॅक्टरखालीं आला.

ड्रायव्हरनं बिचाऱ्यानं आपल्यापरी शिकस्त केली.

चारी बाजूंनीं गर्दीतून एकच हाहाःकार उठला, "गेला म्हातारा–दाजी मेला—"

आणि अखेर हा अजस्त्र ट्रॅक्टर थांबला तेव्हां–तेव्हां–दाजी नावराच्या शरीराचा चेंदामेंदा झाला होता. जमिनीवर रक्ताची राड झाली होती.

* *

**पुढचं** दार उघडंच होतं. विजयनं ओटीवरून कान्ताला हांका मारल्या, दार जोरजोरानं वाजवलं. जबाब नव्हता. कोणीच दाद घेत नव्हतं.

तो तसाच घरांत शिरला. माजघरांत आला. कॉटवर आतेबाई झोपली होती. कान्ता पंचानं आईचं घामानं चिप् भिजलेलं अंग पुसत होता. वासंती कुठं नव्हतीच.

विजयची चाहूल प्रथम लागली आतेबाईलाच. झोपेंतून तिला जाग आली. कुशी वळत ती पुटपुटली, "कशाला परत करतां डबा? तुमच्या जवळच राहूं द्या—"










"दाजींनी दिलाय्." विजय बोलला. प्रयत्न करूनहि त्याला हंसू येईना. घरांतील वातावरणच असं सुन्न आणि शून्य होतं.

आतेबाईनं जाब केला नाहीं.

तेव्हां कान्तानं आईला म्हटलं, "आई, जागी आहेस का तूं ? विजय आलेत—"

तरीहि जाब नाहीं, कीं तिनं डोळे उघडले नाहींत. तशीच स्वस्थ, निपचित पडून राहिली. हाताला धरून कान्ता तिला हलवून जागा करायला गेला. आणि तिच्या हाताचा स्पर्श होतांच चमकला. "अहो आईचा हात कसासाच लागतो– थंड, जड, ताठ–"

तसा दचकून विजय पुढं धांवला. जवळ गेला. आतेबाईच्या चेहऱ्याकडे पाहिल्यावरच त्याला कळलं. त्यानं विचारलं, "वासंती कुठंय् ?"

"ताई खूप आजारी आहे. म्हणून पडलीय् काळोखांच्या खोलींत."

"बरं, तूं पळ ! डॉक्टरला घेऊन ये– तांतडीनं." त्यानं कान्ताला बाहेर काढला.

मग काळोखाच्या खोलीच्या दारावर उभं राहून त्यानं सांगितलं, "वासंती, आतेबाई गेली–"

"काय ?" वासंती ताडकन् उठली. उकळतं पाणी अंगावर सांडावं तशी. फडफडत, तडफडत दारापर्यंत आली. दाराला धरून कशीबशी उभी राहिली. थोडा वेळ, पराकाष्ठेनं सर्व शक्ति एकवटून.


शिर सलामत तो.....

"डॉक्टरला आणण्यासाठीं कान्ता गेलाय्–"

"डॉक्टर ? नको – नकोच !" वेडीपिशी होऊन वासंती ओरडली. त्या तशा प्रसंगाला सुद्धां तिचं हें विक्षिप्त बोलणं ऐकून विजयला अजब झालं. तोंडावर हात घेऊन ती मागं फिरली. आंतल्या काळोखांत धाडकन् अंग टाकून धाय मोकलून रडूं लागली, "डॉक्टरला कळेल–माझा आजार, हें कर्म. मला उठवत नाहीं, चालवत नाहीं, मोडून पडलेंय् मी. फक्त रडतां येतें हें असं...विजय, अॅबॉर्शन केलंय् मी– गर्भपात ! होय रे – होय—होय"

दोन्ही हातांनीं डोकं गच्च धरून विजय नुसता उभा होता.

कितीतरी वेळानं त्याला वाचा फुटली. घोगऱ्या, सद्गदित आवाजांत तो बोलला, "वासंती, बाहेर नको येऊंस ! खोलींतच पडून रहा. मी बघतों सगळं सगळं..."

वासंतीला थोरला भाऊ असता तर त्यानंहि असाच धीर दिला असता.

* * *

**तारेनं** सोलापूरला वासंतीच्या आजोबाला बातमी गेली. म्हातारा धांवत आला.

आठ दिवसांनीं आतेबाईच्या दोन्ही मुलांना घेऊन तो सोलापूरला परतला. शिरोड्यापर्यंत यांना गोळेसाहेबानं आपली मोटर दिली होती.

मोटरमध्यें वासंती तोंडावर हात घेऊन मुसमुसत रडत होती

कान्ता बाहेर तोंड काढून भुकेल्या डोळ्यांनीं आपल्या गांवाचा अखेरचा निरोप घेत होता. तो मोकळा वारा फुफ्फुसांत सांठवून ठेवत होता. आठवणींच्या खूणगांठी अंतरांत पक्क्या बांधीत होता.

गांव मागं गेलं. मोटर रानांत चढावाला लागली. तळीवरच वडाचं झाड जवळ आलं.

माचळतीला तिकडे पलिकडे भीष्माचा डोंगर—

नाहीं ! डोंगर नव्हताच. बिल्कुल सपाट झाला होता. कुठं झाड नव्हतं, झुडूप नव्हतं. पान सुद्धां दिसत नव्हतं. दिसत होत्या फक्त खाणी– मँगनीजच्या! माती अन् दगड, दगड न् माती ! ह्यांच्या राशी, ढीगच ढीग ! आणि हेच आतां आभाळाला भिडूं बघत होते. गगनाला गवसणी घालायला निघाले होते.

आणि ते बघून कान्ताचा आजोबा म्हणत होता, "कमाल आहे ! गांव भलताच पुढं आला."

●●●






*आमची झोप भीतीमुळें उडालेली नाहीं. तशी ती हळवी आणि कची नाहीं. असतां कामा नये. तो निद्रानाश एका जागृत जाणीवेंतून जन्म पावलेला— पत्करलेला असतो.*

*कारण—"खरी झोप ही नेहमीं 'जागृत' असते."*

*वाटत नाहीं? जरा विसंगत*

*वाचा! म्हणजे मत बदलेल—*

# मा ण सें .....

## झोपणारीं आणि न झोपणारीं

—प्रभाकर श्रीधर नेरुरकर

**तुम्ही** मला भेटलांत कुठेंहि. कधींहि. मीच तुम्हाला पहिला प्रश्न विचारीन. आणि मग तुम्ही जें मला उत्तर द्याल त्यावरूनच मला आपला परिचय होईल. तुम्ही कोणत्या प्रकारचीं माणसं आहांत तें मला अचूक ज्ञात होईल. कसें ?

मी तुम्हाला विचारीन, "तुम्ही झोपता का ?"

"म्हणजे ?" तुम्ही मला वेडा ठरवीत पण साश्चर्य विचाराल...

मग म्हणाल "आम्ही झोपतोंच कीं ? या पृथ्वीतलावर कोणता मानवप्राणी झोपत नाहीं ?..."

मात्र तुमच्या या प्रतिप्रश्नांचा माझ्यावर दृश्य अदृश्य कोणताच परिणाम होणार नाहीं. मी मख्खपणें तुम्हाला परिप्रश्न करणारच... मी म्हणेन...

"खरं हो... अगदी खरं... तुम्हीं झोपतां हें बरोबर... पण मला निक्षून प्रामाणिकपणें सांगा. तुम्हांला झोप लागते का ? झोप हं... खरीखुरी गाढ, गूढ, डारडूर झोप लागते का ? म्हणजेच तुम्ही झोपता का? बोला ?..."

यावर तुमचं झोपेचं सोंग सारं सटकन निसटून खाली गळेल. तुमचे दबलेले डोळे सताड उघडतील. आणि मग तुमचं उत्तर तुम्हाला सरळ सरळ स्पष्ट द्यावं लागेल.

"नाहीं हो.. खरंच, आम्हाला रात्रीं नीटशी झोपच येत नाहीं. कित्येक दिवसांत गाढ अशी झोप आलेलीच नाहीं.. थोडक्यांत म्हणजे मी झोपणारा असूनहि झोपत नाहीं..." कांहींजण...

"हो हो.. आम्ही अगदी गाढ झोपतों.. मात्र तुमचं तें गूढ बिढ आम्हाला कांहीं कळत नाहीं. आम्ही झोपतों म्हणजे झोपतों... बोला, यावर तुमचें कांहीं म्हणणें आहे का?" इतर कांहींजण

माझें कांहींच बोलणे नसतें.

"नाहीं हो... आणि होय हो पण... तसं म्हटलं तर आम्हांला झोप लागते आणि तसंच अगदीं म्हटलं तर झोप लागत पण नाहीं..." अन्य इतरेजन... ऊर्फ आणखी कांहींजण...

कदाचित् तुमच्यापैकीं कांहीं अत्याधुनिकांशीं माझी गांठ पडली तर ते मला अनुप्रश्न करतील...





अनुक्रमणिका

"कां हो ?.. माणसाला खरंच कधीं झोप लागते का ?... झोप ही मुळांत आधी वस्तुस्थिति आहे का ?"

आतां या तीन चार प्रकारच्या उत्तरांतून मी केवळ दोन प्रकारचं वर्गीकरण मांडून माणसांचा प्रकार निश्चित करीन. अगदीं काणेकरी शैलींत मांडायचं म्हणजे मी म्हणेन कीं माझ्या मतें माणसांचे दोनच प्रकार आहेत. पहिला झोपणाऱ्या माणसांचा. दुसरा न झोपणाऱ्या माणसांचा. अर्धवट झोपणाऱ्या माणसांचा प्रकार आपण अर्धा अर्धा हवा तर दोहोंतही समाविष्ट किंवा 'को-ऑप्ट' कां काय म्हणतात तसा मानून घेऊं.

माझ्या स्वत:विषयीं म्हणाल तर मी ठळकपणेंच न झोपणाऱ्या वर्गांतील अनंत झोपा टळलेला व झोपांना निरंतर मुकलेला झोपनष्ट व झोपदुष्ट असा असामी आहे. झोप ही वस्तुस्थिति मुळांतच माझ्या वाट्याला कमीत कमी कां यावी याचं कोडं अद्यापि मला उलगडलेलं नाही. आणि कदाचित् ज्या क्षणीं मला तें उमजेल त्याच क्षणीं मी झोपी गेलेला असेन. कुणी सांगावं ? पाळण्यांतलं मला कांहीं नीटसं आठवत नाहीं. माझ्या आईलाहि मी विचारून पाहिलं. तिलाहि कांहीं सांगतां येण्यासारखं आठवत नाहीं. पण तेव्हां मी डारडूर झोपत असे असं ती निक्षून म्हणते. कारण तिची त्यावेळीं तरी माझ्याकडून अवेळीं रात्र रात्र झोपमोड झाल्याचं तिला आठवूनहि आठवत नाही. म्हणजेच त्या अत्यल्प काळांतच मी झोपणारा होतों, झोपत होतों, झोपलेला होतों एवढीच स्मृतीची झेप मी घेऊं शकतों...

माझी पहिली झोपमोड झाल्याचं मला आठवतं. चांगलं आठवतं. मी मराठी शाळेंत जाऊं लागलों. तिथें पहिली पासून चवथीपर्यंत गणित शिकवायला आम्हाला एकच मास्तर होते. त्यांनी माझी पहिली झोपमोड केली. तोंडीं गणितापासून लेखी अंकगणितांपर्यन्त त्यांनी आम्हांला आमचे कान उपटीत अन् अक्षरश: बत्तिशी बडवीत बुचकळत डुचमळत नेलं. मी तर तेव्हांपासून गणिताची धास्तीच घेतली. तेव्हां मला आठवतं कीं रात्रौ खुशाल बिछान्यावर अंग टाकायला जावं, डोळें पेंगू लागावेत, झोप झपझप येत आहे, आपला घोस घसघशीतपणें गिळीत आहे, आपण काया वाचा मनेंकरून तिला शरण जात आहोंत, आणि काय ?... गळाच्या टोकाला लटकलेलं भक्ष्य पाण्यांत माशानं धरल्या न धरल्यासारखं करावं, हिसडा द्यावा, अन् सहजपणे सोडून पसार व्हावं, अन् गळ अजागळासारखा वजनशून्य लोंबत रहावा अधांतरीं, तशी माझी दारुण अवस्था व्हायची. सकाळीं शाळेंत शिकलेले आणि कानशीलं गरमागरम होत असतांना घोकलेले बेकीपासून तो औटकीपर्यंतचे अठरापगड अचकट विचकट आकडे प्रचंड राक्षसी स्वरुप धारण करीत समोर उभे ठाकायचे. बिचारी झोप.. माऊली ती ! बिचकत, बाचकत, लाजत, मुरडत, स्त्रीसुलभ शालीनतेनें जवळ जवळ येणारी... ती त्या आंकड्यांचं अक्राळ विक्राळ दर्शन होतांच पळून गेल्याची व मला असहाय्यपणें 'या निशा सर्वभूतानाम्' अशा क्षणीं 'तस्यां जागर्ती संयमी..' अशा अवस्थेला नेत नेत पुन: परत न आल्याचें चक्क आठवतें.

तेच माझे पहिले झोपमोडीचे दिवस.

तेव्हांपासून मला वाटतं माझी झोपमोड अव्याहत चालू आहे. आतां तर रात्र रात्र झोप येईनाशी झाली आहे आणि दिवसा उजेडीं जेवढा मी जागृत नसतों, तेवढा मी रात्री जागा व जागेवर असतों. म्हणूनच घरांत आणि घराबाहेर गाढ झोपीं जाणाऱ्या लोकांचा मला हेवा वाटतो. कधीं कधीं किंवा अलिकडे नेहमींच म्हणा पाहिजे तर, मला त्यांची कींव येते. मला तर एक गाढ व भरपूर झोपणारा माणूस ठाऊक आहे. त्यानें अजून उष:काल पाहिलेला नाहीं. त्याच्या जीवनाचा सायंकाळ समीप आलेला आहे. तरीपण त्याला झोपमोड करून, 'प्रभातसमयो' पातलेला डोळे मोडून पहाण्याची, मुळीच इच्छा नाहीं. या स्वभावाला काय म्हणावें हेंच मला कळत नाहीं.

परवां एकदां मला विमानानें नागपूर ते मुंबई प्रवास करण्याची संधि प्राप्त झाली. आम्ही नागपूर विमानतळावर रात्री बारा वाजतां जाऊन पोचलों. दीडला विमानोड्डाण होणार होतं. वेळेवर उतारूंना सूचना देण्यांत आली. सर्वजण विमानाकडे निघाले. नव्वद पंचाण्णव प्रवासी होते सर्व. स्त्री, पुरुष, मुलें, परदेशी... विमानांत प्रत्येकानें आपापली जागा घेतली. मला खिडकीकडची जागा हवी होती. पण मधली मिळाली. माझ्या उजव्या हातालाच खिडकीजवळ एक गृहस्थ बसले होते. विमानाची हालचाल सुरूं झाली. पट्टे आवळले गेले. कुणा एका अधिकाऱ्यानें ब्लँकेट्स् प्रत्येकाच्या अंगावर आणून टाकलीं...सुंदर, उबदार, निळी, मऊ मऊ.. .आणि लवकरच आम्ही अंतराळांत पावलो. आंतील विद्युद्दीपांचा मंद प्रकाश पेटत होता. वर वर जात खालीं खालीं पहातांना प्रत्येक जण धुंद होऊन जाणार अशी मी भाबडी कल्पना करून घेतली होती. पण माझ्या शेजारच्या खिडकीकडे बसणाऱ्या प्रवाशानें पहिली गोष्ट केली ती म्हणजे खुशाल ताणून दिलं. ब्लँकेट अगदी अर्ध तोंड झांकलं जाईल इतकं अंगावर ओढून घेतलं; खिडकीजवळचा मंद दिवा त्यानें बंद केला. अवघ्या काहीं क्षणांत हे सद्गृहस्थ घोरूं लागले असते... मी स्वत: झोपेला मुकणार होतों याचं मला दु:ख नव्हतं. खिडकी फुकट जात होती हें शल्य मला बोचत होतं.









SUNLIGHT
Soap
नव्या फॉर्म्युलाचा
सनलाइट
अधिक चमकदार धुलाईसाठीं






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास







अनुक्रमणिका

मी मनाचा हिय्या केला अन् बोललों... इंग्रजींत...

'महाराज, आपण झोपणार असं दिसतं ?'

'मग ?.. काय करायचं ?.. येईल तितकी झोंप तर घेऊंया...'

'पटतं मला...'

'मग झोपा झालं...

छे: छि: म्ला झोप येणारच नाहीं...

'अस्सं ?...'

'एक विनंति करूं का ?...'

'काय वरं ?...'

'मला आपली जागा द्याल तर आभारी होईन....'

''एवढंच... **Matters very little**'. असं म्हणून त्यांनी क्षणार्धात या कुशीवरून त्या कुशीवर वळावं त्याप्रमाणें लीलया जागा वदलली. मला खिडकी मिळाली. मी सहज मागे वळून पाहिलं. वहुतेक कुणीहि जागं नव्हतं. निळी, ऊवदार पांघरुणं सरसावून सर्व सह-प्रवाशी सुखरूप झोपी गेले होते. इतक्यांत दिवे विझले अन् आंत काळोख पसरला. कुणाच्या झोपेंत व्यत्यय येऊं नये म्हणून विमान चालकांनीं ही दक्षता घेतली असावी. खरोखर मला पोटभर हंसावं, खदखदून हंसावं, असं वाटलं. पण मी मलाच आवरलं. आतां काय म्हणावं या लोकांना तेंच मला कळेना... माझ्या मनांत एक अभद्र विचार येऊन गेला. विमानाच्या वेगानेंच ! समजा हें विमान आतां यावेळीं कोसळलं तर ?...मग जी या सर्वांची कदाचित् पहिली आणि अखेरची झोपमोड होईल...आणि कदाचित् मला अपघाताच्या जाणीवेनें डोळे घट्ट मिटून घ्यावे लागतील अन् खरीखुरी गाढ झोप पहिली व अखेरचीच लागायची ! . . . ."

माझे एक सहकारी आहेत. त्यांना रात्रीची झोप येत नाहीं. पण दिवस उजाडला अन् ते लोकलमधून प्रवास करूं लागले कीं त्यांना हटकून गाढ झोप लागते. त्यांना पुष्कळदां जागृत करण्याची पाळी माझ्यावर येते भर दिवसां. त्यांचं म्हणणं असतं कीं आगगाडींत प्रत्येक व्यक्तीला नैसर्गिक झोप लागते. कारण आगगाडीचं पाळण्याशीं साम्य आहे. पाळणा हालतो. गाडी हालते. पाळण्याच्या गतीला rhythm प्राप्त झाला कीं झोपेचा अंमल चढूं लागतो. आगगाडीची धांव नेहमीच लयींत असते. तिला पाळण्यासारखाच Rhythm प्राप्त होतो. आंतील व्यक्तींवर साहजिकच झोपेची झोपड पडूं लागते. हां हां म्हणतां त्यांना वाळनिद्रा आलीच पाहिजे. वृद्धत्वांत सुद्धां वाळनिद्रा लाभणं यासारखं दुसरं भाग्य नाहीं असं त्यांचं तत्त्वज्ञान आहे. आणि ही निद्रा फक्त आगगाडींतच प्राप्त होते. अन्यत्र नाहीं. म्हणूनच रात्रीं चाळींत चुळवुळ करीत जागं राहाणं त्यांना दिवसां आगगाडींतील प्रवासाच्या अपेक्षेनें आक्षेपार्ह वाटत नाहीं. मी त्यांच्या ह्या विचारसरणीला 'पाळणा--सिद्धांत' असं नांव ठेवलं आहे. एरवी त्यांच्या घरांत नेहमीच पाळणा हालत असतो. तें त्यांच्या झोपमोडीचं कारण असावं असं मी म्हटलेलं मात्र त्यांना पटत नाहीं. अगोदर झोपमोड अन् म्हणून पाळणा असा दावा पण ते ठासून मांडतात.

मी आगगाडीनं नेहमी प्रवास करतों. पण 'झोप कुठें ?' अशीच माझी अवस्था होते.

पुष्कळदां निद्रेच्या मोहानं मोहनिद्रा घ्यावी असं मला फार फार वाटतं. पण मग तो मोह मी कटाक्षानं टाळतों. कारण निद्रानाशाच्या नशेला मी मुकेन अशी मला भीति वाटते. करकोचाच्या चोंचींतून कुठें चुकारं खाली ठिवकणाऱ्या कांहीं थेंबावरच जशी कोल्ह्याला गुजराण करावी लागली, तसंच मला सुद्धां कुठें इथें तिथें अनवधानानं वाटचाला येणाऱ्या झोपेवरच 'मी झोपलों होत्रों तर...' असं मानून संतृप्त व्हावं लागतं. एक खरं कीं झोपेचं गूढ मला उकललं आहे. 'झोपी गेला तो नर मेला संशय त्याचा धरूं नका...' असं कवीनं केव्हांच सांगून टाकलं मुद्धां ! 'कोटयवधि जगतांत जीवाणू जगति अन् 'झोपती' अशी काव्यपंक्तींत किंचित् सुधारणा करून मी पण म्हणेन... म्हणूनच 'झोपा आणि झोपूं द्या.' जे झोपणारे आहेत त्यांना खुशाल झोपूं द्या. कारण झोप हा यांचा जन्मसिद्ध हक्क आहे. झोपण्यासाठींच ते जन्म घेतात आणि जन्मत:च ते झोपी जातात. त्यांना मग झोप येत नाहीं, असा क्षण नसतो व झोपेसाठीं विशिष्ट वृत्ति अन् ठिकाणच हवं असतं असं बंधन नसतं. ते जेवतांना झोपतील अन् झोपतां झोपतां जेवतील. ते वाचतां वाचतां झोपतील आणि झोपण्यासाठींच तेवढं वाचतील. त्यांना कचेरींतील खुर्चीवर झोप येईल अन् खोलींतील कचऱ्यांत सुद्धां ते डारडूर झोपतील. ते चालतांना झोपतील अन् झोपेंतच चालतील. झोपेला ते एका झोपेंतच गांठतील आणि एका झोपेंतच झोप त्यांना गांठील. ही सर्व झोपणाऱ्या वर्गांतील माणसं. त्यांना स्वर्ग तसा झोपे-पुरताच उरलेला असतो. नाहीं कधीं त्यांना निद्राभंगाचं भय ! न निद्रानाशाचं सुख ! 'निरंतर निद्रा' हेंच त्यांचं ब्रीदवाक्य ! या माणसांनी जगाचं कांहीं फारसं भलं केलं, असेही नाही; वाईट केलं कांहीं, असंहि म्हणतां येणार नाही. येथें कोणाचें काय वा गेलें ?...? असं तुकोवांच्या भाषेंत विचारलं तर ते म्हणतील 'आमचें कांहींच गेलें नाहीं. झोपसुद्धां कधीं गेली नाहीं...' अनहित कुणाचें झालें असेल तर त्यांचें....

...जे चिंतातुर होतात, हकनाहक व्याकूळ होतात, निष्कारण हळवे बनतात अन् उद्यांचा उदंड विचार करीत हातचा 'आज' घालवून स्वत:च्या झोपेचं खोबरं करून घेतात.

अशा तऱ्हेनं झोपेचं अन् झोपणाऱ्या माणसांचं रहस्य मला अवगत झालं असूनहि, मला आवडतात ती माणसं मात्र आहेत दुसऱ्या वर्गांतील... न झोपणारीं माणसें ! माझ्यासारखी किंवा तुमच्यासारखी म्हणा हवं तर ! कारण माझं हें 'निद्रारहस्य' तुम्ही अखेरपर्यंत न झोपतां वाचलंत कीं तुम्ही दुसऱ्या वर्गाचे सहप्रवासी आपोआपच ठरतां. नाही काय ? जोंपर्यंत ही न झोपणारी माणसं झोपत नाहींत तोपर्यंतच ती











खरीखुरी जिवंत असतात अशी माझी धारणा मी निश्चितपणे मानतो. भोंवतालचं मानवी विश्व आज भयाकुल झालं आहे असं म्हणतात. असेंही म्हणतात कीं भीतीनें कोटयवधि जनसमूहाची झोप कायमची उडाली आहे. अणुयुद्धाची भीति... मेगॅटन बॉम्बची भीति... लोकसंख्येची भीति.. काल्पनिक भीति.. खरीखुरी भीति ! पण भीतीमुळें झोप उडालेली माणसें मात्र मी माझ्या 'न झोपणाऱ्या वर्गांतील' मानीत नाहीं. आमची झोप भीतीमुळें उडालेली नाही अन् तशी ती केवळ भीतीनें भ्रष्ट व नष्ट होण्याइतकी हळवी पण असतां कामा नये. म्हटलं तर ज्यांची झोप त्यांच्या मुठींत आहे पण जे तिच्या मुठींत कधींच गेले नाहींत, तीच खरीखुरी न झोपणारीं माणसं. योग्यां-प्रमाणें कदाचित् ती संयमी नसतील; पण योग्यांत अन् त्यांच्यांत एक समानधर्माचं नातं नेहमी वावरत असतं. त्यांना भविष्य-काळाची भीति वाटते असं नव्हे; व भूतकाळा-बद्दल ते हळहळत असतात असंही नव्हे. पण वर्तमानकाळांतील वास्तवाची त्यांना इत्थंभूत जागृत जाणीव असते. म्हणूनच नेणीवेच्या निद्रेनें स्वतःला वेटाळून घेण्यापेक्षां जाणी-वेच्या निद्रानाशाला ते आपण होऊन कवटाळतात. ध्येयवाद्यांप्रमाणेंच ते निर्झोपेचे निखारे आपल्याच हातीं पदोपदीं पसरून वेहोषपणें जागेच राहणे पत्करतात. झोपेबद्दल ते बेफिकीर असतात. याचं कारण त्यांना ठाऊक असतं. एक झोप त्यांची वाट पहात असतेच ! काळझोप ! ती तर चिरनिद्रा पण चिरंतनाकडे जायला निघण्यापूर्वी जें नश्वर, जें ऐहिक व जें मानवी तें निद्रेच्या नशेंत समोरचं गमावून कां वसा, असा त्यांचा ध्यास असतो. जीवनाला जिंकायला निघालेला माणूस आज जीवनाचंच भक्ष्य झाला आहे. जगणं म्हणजे जीवन कीं मरणं म्हणजे जीवन हेंच त्याला कळेनासं झाल आहे. मरणाच्या आणि मारणाच्या आणाभाका चौफेर चालूच आहेत. माणसं म्हणजे मुंग्या ! कुणाही उन्मत्त सत्तापिपासू सैतानी सम्राटाने सहज पायदळीं चिरडून टाकाव्यांत. मुंग्यांना सुद्धां झोपेचं वावडं नसतं. पण त्यांचं वारुळ उध्वस्त करून टाकणाऱ्या दुष्ट शक्तिसमोर त्या किती केविलवाण्या होऊन आकांताची अंतिम धांवपळ करतात ! उद्यां आज झोपी गेलेल्या माणसांची तशीच असहाय्य अवस्था होणार नाहीं काय ?

पण झोपेचे कर्दनकाळ ठरणाऱ्या माण-सांना उद्यांची कर्दनकाळ काळनिद्रा प्रथम हडसावून खडसावून जागी करील; परंतु ती जाग आली तरी आगींतून फुफाटयांत गेल्याप्रमाणं त्यांच्या वाटेला येणाऱ्या अनंत यातनांची जाणीव दुसऱ्या वर्गांतील...म्हणजेच न झोपणाऱ्या माणसाला सदैव सारखीच जागृत असते. म्हणूनच मानवी मनाला या यातनांतून मुक्त करण्यासाठीं अन् त्याला खरंखुरं निर्भय झोपेचें सुख देण्यासाठींच न झोपणाऱ्यांना निद्रानाशाच्या नशेंतच तर होऊन मानवसमाजाला आशावादाकडे न्यायचं आहे. जागृत करावयाचं आहे. आमची आजी नेहमी म्हणायची..., 'बाळा खरी झोप ही नेहमी जागृत असते.... आज जागृत झोपेचीच अत्याधिक जरुरी आहे. खरं ना ?....






**:८:**

*सत्य कधीं अद्भुताहून अदभूत, अतर्क्य असतं--कमांडर* **जेम्स कल्व्हर्ट** *ह्यांची ही धाडसी प्रवास कथा ह्या 'अद्भुता'चा साक्षात्कार घडवील.*

**अनु.: श्रीकृष्ण ठाकूर**

**'सावकाशीनं,** सावकाशीनं....

जहाज अगदीं सावकाशीनं वर घ्या...सा—व—का—श ! अरे हें वर्फ अगदीं जवळ दिसतंय्, निकल्सन, इथं जहाज वर घेण्यासाठीं भरपूर जागा नक्की आहे ना ?'

मेडाग्लीयानं चालवलेल्या या माझ्या हुवेहूव नकलेनं हास्याचा घवघवा फुटला होता. त्यांच्या त्या मजेचा विघाड होऊं नये म्हणून मी तियून हळूंच निघून गेलों.

संध्याकाळीं साडेसहाच्या सुमारास वॉल्ट विटमननें प्रक्षेपीत केलं कीं आपण वर्फमय प्रदेशांतून मुक्त झालों असं मला वाटतं. मी, स्केट ही पेरिस्कोपच्या लांवीएवढया समुद्रपृष्ठाखालीं आणली व वरची परिस्थिती पाहूं लागलों. गुलावी ढगांतून सूर्य अस्ताला जात होता आणि वर्फाची केवळ एक शुभ्र रेपा उत्तरेला दिसत होती.

टाक्यांमधें हवा घुसली आणि स्केट समुद्रपृष्ठावर आली — पहात रहावं अशा तोऱ्यांत ती वर आली. लौकरच ती डोलूं लागली. मध्येंच ती आपलं नाक पाण्यांत खुपसी— फेंदारी व मर्ग पाण्यावाहेर काढून वर करी. समुद्राचं पांढरंशुभ्र फेसाळ पाणी नाळेवरून खालीं कोसळत होतं. आर्क्टिकच्या वर्फाखालीं कोंडून घेण्याऐवजीं मोकळ्या अशा अटलांटिकमधून प्रवास करायला मिळतोय् याचाच तिला जणू काय आनंद झाला होता.

आम्ही पुष्कळसे रेडिओ संदेश पाठवले व नंतर परत एक वेळ आम्ही पाण्याखालीं गेलों व हुकुमाप्रमाणें नार्वेमधील वर्जेनच्या दिशेनें निघालों.

पाण्याखालीं गेल्यावर मी मागें इंजिनरुममध्यें गेलों. स्केटविषयीं त्या सायंकाळीं मला जें काहीं वाटलं तें मी कधींच शव्दानीं वर्णन करूं शकणार नाहीं. जहाजं किंवा यंत्रं माणसाची सेवा करतात. त्या माणसांना त्या जहाजाविषयीं किंवा यंत्रांविषयीं ज्या भावना असतात त्या शव्दातीत असतात. खरं म्हणजे तर्कवुद्धीला हें पटणारं नाहीं, पण म्हणून तें खरं नाहीं असं नाहीं.

जेव्हां मी पाइपांच्या चकाकत्या रागांमधून फिरूं लागलों आणि जेव्हां टर्वाइन्समधून प्रोफेलर्समधें जाणाऱ्या शक्तीचा घशांतल्या घशांत "घुरघुरणाऱ्या आवाजासारखा आवाज ऐकला तेव्हां माझ्या पाठींतून वरून खालपर्यंत एक शिरशिरी निघून गेली. हीं यंत्रं—त्यांच्या सुव्यवस्थित चालण्यावर आमचे सारं जीवन अवलंवून असतं—हीं कधीं अडखळलीं नाहींत, एकहि ठोका चुकवला नाहीं. तेव्हां हीं यंत्रं म्हणजे निर्जीव वस्तू नसून जिवंत प्राणी आहेत असं मला वाटलं, तर त्यांत काय चूक!

तिथल्या एका दालनांत विल् लेमन पहाऱ्यावर होता. त्याच्या चेहऱ्यावरील भावनाविष्कारांनीं मला कळलं कीं मला काय वाटतं तें त्याला स्पष्ट शव्दांत सांगण्याची आवश्यकता नाहीं.

'कॅप्टन आपलं हें जहाज फार छान आहे !' तो सरळ सिध्या खात्रीनें म्हणाला. विलच्या अवोलपणाच्या दृष्टीनं पाहिलं तर हें वाक्य फार काहीं सांगणारं होतं.

वर्जेनमधील आमचा प्रवेश मी कधींच विसरणार नाहीं. पाण्याच्या कडेला गोष्टींच्या पुस्तकांत असतात तशा, लाल, पिवळ्या आणि निळ्या रंगांनीं तळपणाऱ्या झोपड्या उभ्या होत्या. त्यांच्या वाजूला रुमाल








हल्चीत कांहीं कुटुंबं उभीं होतीं, सर्वाकडे नॉर्वेजियन निशाणं अभिमानानें फडफडत होतीं. एका कुटुंबानें तर आमच्या सन्मानार्थ स्कायरॉकेट आकाशांत उडविलं. यावेळीं एक जुनी अभिमानास्पद आठवण मला झाली. ती गोष्ट पांसष्ट वर्षापूर्वीची होती. नान्सेनं आणि त्याचं मजबूत जहाज 'फ्रॅम' याच लांबट चिंचोळ्या समुद्रपट्टीतून उत्तरेकडे जावयास निघालं होतं. आणि आतां आमचं स्वागत करणाऱ्या याच चकाकत्या झोपड्यांनीं आणि निशाणांनीं त्याच्या प्रवासाविषयीं शुभेच्छा व्यक्त केल्या होत्या.

ऑस्लोमध्यें ज्या म्यूझियममध्यें आतां राष्ट्रीय अभिमानाची गोष्ट म्हणून 'फ्रॅम' ठेवलेली आहे तेथें कांहीं दिवसांनंतर एक समारंभ साजरा झाला. नान्सेनच्या पुतळ्याच्या पायथ्याशीं आम्हीं पुष्पगुच्छ ठेवला व आमच्या भेटीची आठवण म्हणून एक ताम्रपट 'फ्रॅम'वर ठेवला. स्केटच्या भेटीचे स्मरण-पट अमेरिकेमध्यें आणि युरोपमध्यें पुष्कळ ठिकाणीं ठेवले आहेत; पण या छोट्याशा लांकडी जहाजावर ठेवलेल्या ताम्रपटानें मला जें समाधान लाभलं तें इतरत्र कुठेंच लाभलं नाहीं.

जसजसे दिवस जाऊं लागले तसतसा पुष्कळ ठिकाणांहून अभिनंदनपर संदेशांचा वर्षाव स्केटवर होऊं लागला. त्यांचा आम्हाला अभिमान वाटतोच पण मला वर्गेन येथील चिंचोळ्या समुद्रपट्टीवरील एका गोष्टीचं सतत स्मरण होतं. तिथल्या खोल काळ्या पाण्यांत, सर हयूबर्ट विल्किन्स यांची अभिमानानं एकदां उत्तरध्रुवाकडे निघालेली 'नॉटिलस' ही पाणबुडी विस्मृतींत गडप होऊन गंजत पडली आहे. त्यांच्या पुष्कळशा नॉर्वेजियन मित्रांपैकीं एक डॉ. ऑड् डाल यांनी विल्किन्सच्या 'अंडर दि नॉर्थ पोल' या पुस्तकाची एक प्रत मला दिली. तें संपूर्ण वाचून संपवीपर्यंत मला खालीं ठेववेना. आम्हीं आतां नुकताच जो अनुभव घेतला आहे त्याचं भविष्य त्या पुस्तकांत ठायीं ठायीं आहे.

वर्जेंनजिकच्या पाण्यांतील त्या सांगाड्याचा विचार परत माझ्या मनांत आला. या पुरुषाच्या दृष्टेपणाविषयीं आणि त्याच्या कर्तृत्वाविषयीं वाटणारी माझी भावना व्यक्त करावी असं मला वाटूं लागलं. मी सर हयूबर्ट यांना, कधींहि न मिळणारा संदेश पाठविला.

' हा संदेश सर हयूबर्ट विल्किन्स यांच्याकडे पाठवावा ही विनंती × या उन्हाळ्यांतील आमचे अनुभव हे तुम्ही व्यक्त केलेल्या अंदाजांशीं तंतोतंत जुळत आहेत हें पाहून आमची मनं हेलावून गेलीं आहेत × जवळजवळ तीस वर्षापूर्वींचीं तुमचीं अनुमानं आणि तुमच्या उद्देशांपैकीं पुष्कळसं या उन्हाळ्यांत प्रत्यक्षांत उतरलें × स्केटवरील सव माणसं आपणाला – कीं ज्यानं आम्हाला कितीतरी वेळां मार्गदर्शन केलं, त्याला – मन:पूर्वक अभिवादन करीत आहेत'

आम्ही अटलांटिकवरून माघारी येतांना सर हयूबर्टनीं उत्तरादाखल पाठविलेला आभाराचा आणि अभिनंदनाचा संदेश आम्हांला मिळाला.

२२ सप्टेंबर रोजीं आम्ही बोस्टनच्या बंदरांत आलों. तिथें हेलिकॉप्टर्स आणि टग्बोट्स ही गर्दी करून राहिली होतीं. आम्ही बाहेर बंदरांत असतांच डेनिस विल्किन्सन् आणि अॅडमीरल रिकोव्हर लॉंचमधून स्केटला सामोरे आले.

आमचं हें साहस यशस्वी झालं याचं कारण म्हणजे या दोन गृहस्थांची दांडगी इच्छा व कल्पनाशक्ति. साहजिकच त्या दोघांना पाहून मला आनंद झाला. पण जसजशी स्केट किनाऱ्याकडे जाऊं लागली तसतसा धक्क्यावरील गर्दीतील मंद हसणारा एक चेहरा मला दिसला. त्या व्यक्तीचं काम सर्वांत कठीण असं होतं – घरीं शांत राहून वाट पहायचं धैर्य त्या स्त्रीनं दाखविलं होतं.

खलाशी जेव्हां समुद्र सफरीवरून घरीं येतो तेव्हां त्याला त्याचं घर जितकं विलोभनीय वाटतं तितकं तें इतर केव्हां क्वचित्च वाटत असेल. दिवस-रात्र, हिवाळा-उन्हाळा, आशा आणि तिची पूर्ति, हे आपल्या जीवनाचे विविध रंग – या रंगांनीं जीवनाचं वर्तुळ पुरं होतं. दूरची समुद्र-सफर आणि तेथून परत येणं यामध्यें या साऱ्या रंगांचें प्रतिबिंब उमटलेलें दिसतें. शंभर वर्षाचं आमचं पांढरं–शुभ्र लाकडी घर यावेळीं जेवढं सुंदर वाटलं तेवढं यापूर्वीं कधीं वाटलं नव्हतं. आणि माझ्या तीन बछड्यांचे प्रश्न आतां जितके औत्सुक्यपूर्ण वाटले तितके पूर्वी वाटले नव्हते. आर्क्टिक महासागर आणि त्याचे प्रश्न हळूहळू माझ्या मनांतून विरत चालले.

पण मला घरीं येऊन कांहीं आठवडे झाले न झाले तोंच आमच्याकडे एक पाहुणा













आला व त्यानें आर्क्टिक विषयींची माझी उत्सुकता पुन्हां एकदां प्रज्वलीत केली. सर ह्यूवर्ट विल्किन्स 'स्केट'वर एक दिवस घालविण्याकरितां आले. वयानं वृद्ध झालेला हा संशोधक अद्यापहि पूर्वीइतकाच उत्साही होता. त्याला अणुसंचलीत पाणवुडीच्या गुंतागुंतीच्या यंत्रणेविषयीं फार जिज्ञासा होती. त्यांची स्वच्छ, प्रेमळ नजर आणि हाताची स्नेहपूर्ण पकड हीं एखाद्या तरुणाला लाजवील अशीं होतीं. स्केट समुद्रांत शांतपणें उभी असतां सर्व सकाळभर आम्ही 'नॉटील-सच्या' १९३१ च्या सफरीविषयीं वोलत होतों.

विल्किन्स तरुण असतांना त्यांनीं विह्यमूर स्टिफन्सनवरोबर आर्क्टिकमधील सफरींत भाग घेतला होता. स्टिफन्सननीं त्याना पटवून दिलं होतं कीं प्रचंड अशा आर्क्टिक महासागराची वारीकसारीक माहिती हवी तर ती पाणवुडीनें वर्फाखालून प्रवास करूनच मिळेल. आणि विल्किन्स हर्स्ट यानीं अंटार्क्टिक संशोधन मोहिमेचें नेतृत्व केलें व ध्रुवावरून इतिहासांत प्रथमच उड्डाणहि केलें. आणि नंतर १९३० मध्यें विल्किन्स यांनीं आर्क्टिक संशोधनासाठीं पाणवुडी मिळविण्याचा जोरदार प्रयत्न केला. 'नॉटिलस' संवंधींचा त्यांचा मुख्य हेतू म्हणजे आर्क्टिकमधील वर्फ-शीलांवर, हवामानाच्या पहाणीसाठीं कायमचा तळ ठोकणं व या तळाला पाणवुडीचा आधार देणं हा होता. त्यांची आजीव ध्येय-निष्ठा म्हणजे आर्क्टिक-संवंधींचे फार दूर काळपर्यंतचे जास्तींत जास्त अचूक असे अंदाज सादर करणं. तसेंच 'स्केटनें' १९५८ मध्यें जें शास्त्रीय संशोधन केलं, जवळजवळ तसंच संशोधन करायचं त्यांच्या मनांत होतं.

जन्मानं ऑस्ट्रेलियन असलेल्या या संशोधकास, कल्पना करतां येण्याजोगा प्रत्येक अडथळा येत गेला. पाणवुडीशीं संवंधीत असलेली प्रत्येक गोष्ट ही कल्पनातीत महाग. सरकारनेंच करावयाच्या या गोष्टी—एकट्या दुकट्या माणसानं नव्हे. त्यासाठीं पैसे जमा करण्याचं काम हें फार दुःसाध्य होतं. लिंकन एल्सवर्थ, विल्यम रँडॉल्फ हर्स्ट आणि टेक्सास ऑईल कंपनी यांनीं मदत करायचं कवूल केलं. आणि उरलेल्या पैशांसाठीं विल्किन्सनें लेख लिहून, व्याख्यानं देवून व स्वतःकडील पैसे देवून भर केली. विल्किन्स यांच्या चिकाटीला शेवटीं यश आलं आणि अमेरिकेच्या सरकारी शिपिंग वोर्डानें त्यांना एक जुनी पाणवुडी दिली. तेरा वर्षं वापरलेल्या त्या पाणवुडीचा शिपिंग वोर्डाला कांहीं उपयोग नव्हता.

विल्किन्स यांच्याजवळ काहीं पाणवुडी चालविण्याचें किंवा पाणवुडी तयार करण्याचें ज्ञान नव्हतें. तेव्हां त्यांनीं, सायमन लेक—पाणवुडीच्या संशोधकांपैकीं एक अग्रगण्य— आणि स्लोन डानेनहोवर—हा अनुभवी पाणवुडी—ऑफिसर होता—या दोघांना नोकरीस ठेवलं. ती जुनी वोट घेऊन ध्रुवाच्या सफरीसाठीं योग्य असें स्वरुप तिला देण्याचें त्या दोघांनीं कवूल केलं. आवश्यक त्या फेरफारांचा नकाशा लेक तयार करणार होता व डानेनहोवर ती चालवणार होता.

आपल्या पुष्कळ वर्षांच्या कारकिर्दीमधें लेक यानें पाणवुडीच्या नव्या स्वरुपावावत काहीं स्वप्नं जोपासलीं होतीं. परिणामीं ती पाणवुडी काहीं अत्यंत उपयुक्त व काहीं अतिशय विचित्र साधनानीं सज्ज झाली. पाणवुडीला वाहेरच्या वाजूनें एक वर्फ कापूं शकेल असा पेरिस्कोप जोडला होता. वर्फाखालून ट्रॉलीप्रमाणें घसरतां यावें यासाठीं तिला एक दांडी जोडली होती. तसेंच पाणवुडी वर्फ—शीलांखालीं जर अडकली तर आंतील लोकांना हवा मिळावी म्हणून वर्फाला भोंक पाडण्यासाठीं तीन गिरमीटें. यापैकीं कितीतरी गोष्टींना सर हर्वर्ट यांनीं विरोध केला पण करारान्वयें लेक व डानेनहोवर यांनाच त्या जहाजाला कोणकोणत्या सुधारणा हव्या त्या ठरविण्याचा हक्क होता.

**विनंती—संपादकाची**

**'लिहा हो चालेल। वाष्कळ चावट**
**'सौ'वरी वात्रट। विनोदहि ॥**
**झालां प्राध्यापक, । बनावें लेखक**
**(आम्हां द्यावे लेख। फुकटचे) ॥**
**—'आंदर्टी'**

शेवटीं एकदाचं सर्व कॉम संपलं, आणि जून १९३१ मध्यें प्रॉव्हिन्स टाऊन वंदरांतून 'नॉटिलस' समुद्रांत वाहेर पडली. पहिल्या दहा दिवसांतच त्या छोट्या पाणवुडीमधें समुद्रावर असतांनाच गंभीर स्वरुपाचा यांत्रिक विघाड झाला. तेव्हां 'व्योमिंग' या युद्धनौकेनें नॉटिलसला किनाऱ्यावर सुरक्षितपणें आणलं. आणि पूर्ण एक महिनाभर इंग्लंडमध्यें तिची दुरुस्ती केली तेव्हां ती परत समुद्रांत लोटण्याच्या लायकीची झाली.

या सफरींतील एक महत्त्वाचे सदस्य डॉ. हेरॉल्ड स्वेरड्रूप हे नॉर्वेजियन गृहस्थ यावेळीं वर्जेनमध्यें 'नॉटिलसची' वाट पहात होते. ते उत्कृष्टपैकीं महासागरीय — नकाशेतज्ज्ञ (oceanographer) असून त्यांनी रोल्ड ॲम्युंडसेन यांच्यावरोवर आर्क्टिकमधें कितीतरी वर्षं काढलीं होतीं. पुढें कॅलिफोर्नियांतील लानोला येथील 'स्क्रिप्स इन्स्टिट्यूट ऑफ ओरानोग्राफी' या संस्थेचे ते प्रमुख झाले.

स्वेरड्रूपना माहित होतें कीं जर 'नॉटिलसला' आर्क्टिकमधील उन्हाळ्याचा फायदा घ्यायचा असेल तर ती स्पिटस्वर्गनला जून अखेरपर्यंत आली पाहिजे. पण तिला यायला जसजसा उशीर होऊं लागला तसतशी त्यांची चिंता वाढूं लागली. शेवटीं एक ऑगस्ट रोजीं दुर्दैवी नॉटिलस वर्जेन वंदरांत शिरली. हें वाडस अर्ध्यावरच सोडायचं नाहीं असा विल्किन्सनीं निश्चय केला होता. व स्वेरड्रूपचा त्यांना पाठिंवा होता. जवळजवळ तीन आठवड्यानंतर 'नॉटिलस' प्रिन्स कार्लस् फोरलंडकडून पुढें निघाली, वर्फ—शीलांच्या प्रदेशांत शिरली व पाण्यावरून वर्फाच्या तरंगत्या शिलाखंडामधून वाट काढीत पुढें चालली. वर्फाच्या जास्त खालून न जातां एखादी घसरगाडी वर्फावरून सरकत जाईल त्याप्रमाणें वर्फाखालून घसरत जायचं असा सर ह्यूवर्ट यांचा उद्देश होता. वर्फाच्या खालीं असलेला खडवडीत भाग त्यांना माहित होता. तरीहि त्या कड्यांवर किंवा अवतीभोंवती घसरत जायचं असा सर ह्यूवर्ट यांचा मानस होता. जेव्हां एखादं

तळं असेल तेव्हां आपोआपच पाणबुडी वर येईल अशीहि योजना होती; आणि यदा-कदाचित् जर का ही योजना फसलीच तर सायमनलेकच्या गिरमीटांपैकीं एखाद्यानें बर्फाला भोंक पाडायचं व त्यायोगें डिझेल इंजिनसाठीं आणि माणसांसाठीं शुद्ध हवा मिळवायची.

सर ह्यूबर्ट यांचे मित्र वारंवार सांगतात त्याप्रमाणें खरोखरच सर ह्यूबर्ट यांना भीति या शब्दाचा अर्थ काय तें माहीत नव्हतें. पण त्यांचे जे सहकारी होते त्यानां भीति म्हणजे काय तें ठाऊक होतं. पाणबुडीचे कप्तान डानेनहोवर यांच्या व्यवस्थेविषयीं सर विल्किन्स अत्यंत सौम्यपणें लिहितात, "त्यांची कार्यपद्धती जास्तीत जास्त कार्य-क्षमतेच्या दृष्टीनें नेहमीच उपकारक असे असें नाहीं." सारीं माणसं नुसतीं घावरून गेलीं. त्यांना परत माघारी घरीं जायचं होतं.

पण सर विल्किन्स यांचा निर्भय निश्चय झाला होता. माघारीं वळणें नाहीं. प्रचंड वादळाला तोंड देत 'नॉटिलस' उत्तरेच्या दिशेनें निघाली. शेवटीं निर्णय घेण्यांत आला कीं पाणबुडी पाण्याखालीं न्यायची. डानेन-होवर यांनी वरच्या बाजूनें पाणबुडीची शेव-टच्या क्षणाची तपासणी केली. त्यानें पाण्या-कडे मागच्या बाजूनें पाहिलें, आणि परत एकदां पाहिलं. मागच्या बाजूचें 'डायव्हिंग प्लेन्स'—सुकाणू निघून गेलें होतें—नाहींसे झालें होतें—हें म्हणजे साधारणपणें—तुम्ही तुमची मोटार सुरू करावयास निघावं आणि पहावं तो गाडीचं स्टिअरिंग व्हीलच चोरीला गेलेलं असावं, तसा हा आघात महा-भयंकर होता.

अनेकांना माहीत असलेलं एक 'गुपित' सर ह्यूबर्टनीं मला सांगितलं. नॉटिलसच्या मागच्या बाजूच्या सुकाणू फळ्या केवळ पडल्या होत्या असं नव्हे तर बर्जेनमध्येंच त्या गुप्तपणें काढून टाकल्या गेल्या होत्या—बहुधा नॉटिलसवरच्या माणसांपैकींच कुणाचं तरी तें काम असावं.

पण, त्या जहाजाचा प्रवास पुढें होऊं नये म्हणून ज्या कोणी प्रयत्न केला त्यानें विल्किन्सना ओळखलं नव्हतं. विल्किन्सनीं

**मेजवानी**

**रामराज्यामध्यें । महागलें अन्न**
**मंत्र्याचें भाषण । मसाल्याचें ।।**
**'झोडा मेजवानी । संगीताची मस्त**
**तवकड्या स्वस्त । केल्या आम्ही' ।।**
**—'आंदर्टी'**

पाणबुडी बर्फाखालीं नेण्याचा हुकूम दिला. त्यांना वाटलं कीं बर्फाखालून घसरत जातांना सुकाणू फळ्यांची कांहीं आवश्य-कता नसावी.

यावेळीं कसा कोण जाणें, पण बर्फाला पाडायचं मोठं गिरमीट, थोडेसें वर केलेल्या अवस्थेंत बर्फात घट्ट अडकलं होतं. तिथनं तें कांहीं खालीं होत नव्हतं. जहाजाच्या दुर्दैवांत आणखी भर म्हणूनच कीं काय हा कित्येक इंच लांबीचा एक पोलादी काटा, गुळगुळीत अशा वरच्या डेकमधून बाहेर आला होता.

तरीहि ते खालीं गेले, एका बर्फ-खंडा-पासून जरा मागें सरून नॉटिलस त्याच्यावर बेफाम झालेल्या बैलासारखी मुसंडी मारून घुसली. त्याचा परिणाम अनपेक्षित झाला. पाणबुडीची नाळ बर्फावर जोरानें आपटली व तिचा चुराडा झाला, ती खालीं वाकली व मग ती वांकडी होऊन बर्फाला चिकटून घसरूं लागली. पण तें मोठं गिरमीट बर्फात घासूं लागलं. व नॉटिलसच्या पातळ कवचां-मधून तो घासण्याचा आवाज इतक्या मोठ्यानं ऐकूं येऊं लागला कीं जणूं काय पाताळांतील दैत्य हें जहाज फोडण्याचा प्रयत्न करीत आहेत! शेवटीं 'नॉटिलस' थांबली. सरकत्या बर्फाखालीं अवंवट अस-लेले नॉटिलसचे पंखे गरगरत होते. डानेन-होवरनें तरीहि पाणबुडी मागें काढली परत पुढें ढकलायचा प्रयत्न केला. पण परत ती नॉटिलस बर्फाखालीं अटकली. नाळ बर्फाखालीं आणि पिछाडी हवेंत अशा अवस्थेंत खडी राहिली.

आणखी थोडे प्रयत्न केले गेले व मग विल्किन्सना खात्री पटली कीं त्यांची दांडगी इच्छाशक्ति सुद्धां आतां पाणबुडीला पुढें ढकलूं शकत नव्हती. 'नॉटिलस' परत माघारीं बर्जेनकडे निघाली.

सप्टेंबरअखेर नॉटिलसच्या नोकरवर्गाचा



पगार देऊन त्यांना मोकळं करण्यांत आलं. या योजनेसाठीं विल्किन्सनीं स्वतःचे अडीच लक्ष डॉलर्सपेक्षां जास्त पैसे खर्च केले व ते कफल्लक बनले. सरकारबरोबरच्या त्यांच्या कराराप्रमाणें त्या पाणबुडीची त्यानीं अशी विल्हेवाट लावायला हवी होती कीं त्यामुळें ती युद्धासाठीं कुणाच्याहि उपयोगीं पडूं नये. नॉटिलसला तिथल्या चिंचोळ्या समुद्रांत ओढून नेलं व तिथें तिचे कप्पे उघडे केले. सहाशें फुटांपेक्षां जास्त खोल समुद्रांत ती तळाशीं जाऊन पडली. याच समुद्रानं प्राचीन काळीं सागरी तांडेलांचीं दिग्विजयासाठीं आणि नवे प्रदेश शोधण्यासाठीं गेलेलीं व विजयी होऊन आलेलीं जहाजं पाहिलीं. १८९३ मध्यें ऑर्क्टिककडे जावयास निघालेली नान्सेनची 'फार्म' पाहिली व १९५८ मध्यें परत आलेली 'स्केट'हि पाहिली.

विल्किन्सची ही मोहीम म्हणजे संपूर्ण अपयश होतं का? नक्कीच नाहीं. बर्फखंडाच्या कडेवर नॉटिलस असतां दोन आठवड्यांच्या मुदतींत स्वैरड्रूपनें मिळविलेली पुष्कळशी शास्त्रीय माहिती ही, अणुसंचलीत जहाजांच्या आगमनापर्यंतच्या काळांत अत्यंत उपयुक्त अशी होती. अविस्मरणीय व्यक्तीच्या दुर्दम्य दृढनिश्चयाचा जणु काय बोलताच पुरावा!

सर ह्यूबर्ट स्केटवरती भोजनासाठीं राहिले. नंतर आम्ही स्केटच्या उत्तरेकडील प्रवासाविषयीं थोडक्यांत चर्चा केली. 'त्या प्रवासासाठीं आवश्यक असलेली सारी माहिती—सारी उपकरणें — जें जें हवं तें तें आपणापाशीं आहे—तेव्हां आतां तुम्ही तिथें हिवाळ्यांत जावं.' एकाएकीं तो वृद्ध संशोधक मला म्हणाला.

हें ऐकतांच मी चपापलों. आर्क्टिकमध्यें उन्हाळ्यांत आढळणारीं तळीं हिवाळ्यांत गोठून गेलेलीं असणार. तसा संशय व्यक्त करीत मी त्यांना म्हटलं 'पाण्याखालून पृष्ठभागावर येण्यासाठीं कांहीं तळीं असणार नाहींत. तेव्हां हिवाळ्यांत तिकडे जाण्यानं कांहीं फारसा उपयोग होणार नाहीं.'

'मला वाटतं तुम्हांला पृष्ठभागावर येतां येईल. कदाचित् पृष्ठभागावर येण्यासाठीं तुम्हांला बर्फाला भोंक पाडावं लागेल. कदाचित् सुरुंगहि लावावा लागेल. नक्की काय करावं लागेल तें मला माहित नाहीं—पण तुम्हांला मार्ग सांपडेल!' त्यानीं निश्वास सोडला व अनंताकडे दृष्टि लावून अर्धवट स्मित करीत ते तसेच थोडा वेळ बसले. मला खात्री आहे कीं वयोमानानं आपणाला असल्या साहसांत भाग घेतां येत नाहीं म्हणून त्यांना अतोनात खंत वाटत असावी.

या शूर आणि उमद्या पुरुषाच्या भेटीनंतर आठदहा दिवसांनीं मला त्यांच्याकडून एक पत्र आलं. त्यानीं लिहिलं होतं 'ह्या हिवाळी मोहिमेविषयीं मी पुष्कळ विचार केला. ती कल्पना प्रत्यक्षांतः आणण्याचं काम तुम्ही केलंच पाहिजे. उदासीनता किंवा कुणाचा विरोध झाला तरी गलितधैर्य होऊं नका. हिवाळी मोहिमेचा पाठपुरावा करा....'

हृदयाचा झटका येऊन त्यांना मृत्यू आल्याचं एक डिसेंबर रोजीं मला कळलं.

न्यू हॅम्पशायरमधील हॅनोव्हर येथील डार्टमथ कॉलेजमध्यें जानेवारी अखेर मी स्केटच्या जलपर्यटनावर एक व्याख्यान दिलं त्यासाठीं मी व नॅन्सी तिकडे गेलों होतों. दुसऱ्या दिवशीं सकाळीं मी डार्टमथच्या प्रचंड बेकर मेमोरियल लायब्ररीमध्यें, डार्टमथच्या नियामक मंडळाचे एक सदस्य विल्जलमूर स्टिफेन्सन यांना भेटलों. त्या ठिकाणीं स्टिफन्सन यांच्या आर्क्टिकविषयक वाङ्मयाचा संग्रह ठेवला आहे. (जगांतील अशा तऱ्हेचा हा नंबर दोनचा संग्रह. सर्वांत मोठा संग्रह, लेनिनग्राड येथील 'इन्स्टिटयूट ऑफ दि आर्क्टिक'मधें आहे—या प्रदेशाचे रशियाला किती महत्त्व वाटतें याचा हा पुरावा.)

उत्तरेकडील आर्क्टिक प्रदेशाबाबतच्या प्रश्नांवरील स्टीफेन्सन हे एक जाणते अधिकारी तज्ज्ञ आहेत. त्यांच्या या वृद्धावस्थेंत देखील ते ठणठणीत आणि ताकदवान आहेत, हें पाहून फार फार समाधान वाटलं. जेव्हां मी त्यांच्या कचेरींत गेलों तेव्हां त्यांनीं आपल्या टेबलाच्या खणांतील काहीं कागद चाळले व एक पातळ कागद शोधून काढून तो माझ्या हातांत दिला. सर ह्यूबर्ट यांना यूरपमधून मी जो संदेश पाठविला त्याची ती प्रत होती; व त्याखालीं लिहिलं होतं 'पत्ता चूक आहे. वस्तुतः हा संदेश तुम्हांला पाठवायला हवा होता—डब्ल्यू.'

शेवटीं आम्ही आर्क्टिक महासागरांत हिवाळ्यांत जावयाच्या विल्किन्स यांच्या सूचनेवर चर्चा केली. स्टीफन्सननीं बर्फाच्छादित शाळेच्या मैदानाकडे पाहिलं आणि म्हणाले 'ते जातें—नक्कीच जातें. अशा अशक्य गोष्टी शक्य करण्याकडे त्यांचा नेहमींच ओढा.'

'या हिवाळी—कल्पनेविषयीं तुम्हांला काय वाटतं?' मी पृच्छा केली.

'गेल्या ऑगस्टमध्यें तुम्ही तिथें जें पाहिलं त्यापेक्षां कितीतरी निराळं, हिवाळ्यांत पहावयास मिळेल.' स्टिफन्सन म्हणाले. 'वरती उघडं पाणी—ही फार विरळी गोष्ट. पण पाण्यावर पातळ बर्फाचा थर असणंही कदाचित् शक्य आहे. वारा वहात नसतांना, व उष्णतामान शून्याखालीं तीस अंश असेल तेव्हां समुद्राचं पाणी पहिल्या दिवशीं सहा इंच गोठेल, दुसऱ्या दिवशीं आणखी चार, इंच गोठेल, तिसऱ्या दिवशीं आणखी चार

## महत्त्वाची सूचना -

**लेखकांसाठीं : बऱ्याच लेखकांचें "दीपावली" कडे आलेलें व नापसंत ठरलेलें साहित्य आमच्याकडे कांहीं महिने पडून आहे. तें परत हवें असेल तर त्या लिखाणास पुरेसें पोस्टेज लेखकांनीं त्वरित पाठवावें म्हणजे तें त्यांच्या पत्त्यावर रवाना करतां येईल. पोस्टेज पाठविणाऱ्यांसच असें साहित्य परत करण्यांत येईल. अन्यथा तें तावडतोब निकालांत काढलें जाईल व त्यासंबंधीं पुनः कसलाहि पत्रव्यवहार केला जाणार नाहीं. नापसंत कविता परत पाठविल्या जात नाहींत याचीहि कृपया नोंद घ्यावी.**

**—संपादक**











अनुक्रमणिका

इंच. याप्रमाणें म्हणजे आठवड्यामध्यें दीड एक फूट उंचीचा वर्फाचा थर तयार होईल.,

'काय हो' स्टीफन्सननीं मला विचारलं. 'तुम्ही तुमच्या स्केटनं एवढं जाड वर्फ फोडूं शकाल का?'

मी प्रामाणिकपणें म्हणालों, 'मला कांहीं कल्पना नाहीं.'

'मी तुम्हांला एक गंमत दाखवितो' स्टिफन्सन म्हणाले आणि त्यानीं स्वतःचं 'दि फ्रेंडली आर्क्टिक' हें पुस्तक काढलं. त्यांतून मर्कन् पानं चाळलीं 'या इथं. हें वाचा.' असं म्हणत त्यानीं पुस्तक उघडून माझ्या-कडे दिलं.

अलास्काच्या उत्तरेला शंभर मैलांच्याहि पलिकडे स्टिफन्सन व त्यांचे दोन सहकारी वर्फावरून प्रवास करीत करीत नुकत्याच गोठलेल्या एका समुद्र पृष्ठाच्या शेजारीं मुक्काम करते झाले. त्यांच्या कुत्र्यांच्या एकाएकीं ओरडण्यानें ते जागे झाले. ज्या आवाजाच्या श्रवणानें कुत्रे चवताळून भुंकूं लागले होते, तो आवाज त्यानींहि ऐकला. व्हेल माशांचा तो आवाज होता. वेलूगा जातीच्या व्हेल माशांचा एक थवाच्या थवा पोहत पोहत नुकत्याच गोठलेल्या समुद्र-पृष्ठाच्या खालून जात होता व जातांना तेथील वर्फ फोडीत होता. स्टिफन्सन लिहि-तात 'तें दृश्य फार वेधक होतं. सहा ते आठ इंच जाडीचं वर्फ ते व्हेल मासे आपल्या पाठीच्या तडाख्यानं फोडीत होते. वर्फ फुटल्याच्या आवाजानंतर क्षणभरानं व्हेल माशांचा 'हिस्स्' असा आवाज ऐकूं येई व पाण्याचा फवारा उडे.

'जर वेलूगा व्हेल, तळचावरचं वर्फ फोडूं शकतात, तर 'स्केटला' तें अशक्य कां वाटावं?' स्टिफन्सननीं हंसत हंसत मला विचारलं.

न्यू लंडनला मी परत आल्यावर मला कळलं कीं ज्यावेळीं मी आर्क्टिकविषयीं वोलत होतों त्यावेळीं नौदल कार्यालय आर्क्टिकविषयीं कांहीं गोष्टी करीत होतं. 'स्केटला' मार्चमध्यें परत उत्तर ध्रुवप्रदे-शांत जायचं होतं व हिंवाळचांत तिकडे जाणं, समुद्रपृष्ठावर येणं वगैरे गोष्टी कित-पत शक्य आहेत याची खात्री करायची होती.

जर आम्हांला वर्फ फोडून मार्ग काढायचा असेल तर आमच्या स्केटच्या डोलकाठीला वर्फ–थरावर दणके मारून तें काम करावं लागेल. या डोलकाठीमध्यें पाण्याच्या दावानें वर खालीं केल्या जाणाऱ्या सुमारें डझनभर छोट्या दांड्या, वातावरणांतील लहरी ग्रहण करणाऱ्या अँटेना, पेरिस्कोप, हवा येण्याच्या नळ्या, तसेंच पाणबुडीच्या सुरक्षित प्रवासासाठीं आवश्यक असणारीं इतर आयुधं हीं असतील. हें तीन हजार टनी जहाज वर्फावर धडक मारील, तेव्हां तो धक्का या नाजुक अवजारांना सहन होईल काय ?

उन्हाळी प्रवासासाठीं केलेली डोलकाठीची ही रचना हिवाळी प्रवासाच्या दृष्टीनं बदलणं प्राप्त होतं. हिवाळी काळोखांत वर्फ खालून ओळखतां यावं म्हणून डेकवरती जास्त शक्तीचे प्रकाशझोत टाकणारे दिवे ठेवावे लागणार होते व वर्फाची नीट पाहणी करतां यावी म्हणून डेकवरती एका पाणीवंद काचपेटींत एक टेलव्हिजन कॅमेरा वसवावा लागेल.

माझ्या मनःचक्षूसमोर स्केटचं चित्र उभं राहिलं. फ्लडलाइट आणि टेलव्हिजन यांनीं युक्त असलेली ही स्केट काळोखांतून शांतपणें चालली होती, व फ्लडलाइट आणि टेलव्हिजन यांच्या मदतीनें वर्फ कुठें फोडावं याचा अंदाज घेत होती. अत्यंत चांगल्या अशा ऋतूंत एक दहा दिवसाचा काळ आम्ही आर्क्टिक महासागरांत वर्फा-खालीं काढला होता. तेवढ्या आधारावर हें धाडस हातीं घेण्यांत आम्ही लहान तोंडी मोठा घास तर घेत नव्हतों? माझ्या मनांत संशय असतांहि कुशल कामगार स्केटवर योग्य त्या सुधारणा करीत होते, आवश्यक तीं यंत्र वसवीत होते.

आमचं हें काम चालू असतां एके दिवशीं मला अॅडमीरल वॉर्डर यांच्या ऑफिसमधून फोन आला. माझ्यापुढें त्यानीं एक योजना मांडली.

'जिम' ते म्हणाले, सर ह्यूबर्ट विल्किन्स-विषयीं तुला फार वाटतं हे मला माहित आहे. त्यांच्यासाठीं शेवटची एक गोष्ट तूं करशील का ?"

अॅडमीरलनीं मला सांगितलें कीं सर ह्यूवर्टनीं स्केटला भेट दिल्यानंतर त्यानीं लेडी विल्किन्सना सांगितलं कीं त्यांच्या मृत्यू-नंतर त्यांच्या देहाची रक्षा पाणबुडींतून उत्तर ध्रुवावर नेली जावी व तेथें ती इतस्ततः फेकली जावी. अखेरपर्यंत त्यांचं अंतःकरण नॉटिलसनें व्यापलं होतं. 'नॉटि-लस' त्यांच्या धाडसी कल्पनाशक्तीचं उच्च-तम प्रतीक.

'अॅडमीरल, तसं करायला स्केटला अभि-मान वाटेल.' मी म्हणालों 'पण बरोबर

उत्तर ध्रुवावर समुद्रपृष्ठावर येणं कितपत जमेल कोण जाणे ! गेल्या ऑगस्टमध्यें कांहीं तें आम्हांला जमलं नाहीं, तेव्हां तें हिवाळ्यांत जमण्याची आशा फारच कमी.'

मी ती रक्षा वरोवर घ्यावी असं शेवटीं आम्ही ठरविलं. मला वाटलं, येन-केन प्रकारेण आम्हांला मार्ग हा शोधून काढलाच पाहिजे.

तीन मार्च रोजीं निघायचं करण्यांत आलं. जानेवारी ते मार्च या दरम्यान आर्क्टिकमध्यें उष्णतामान कमी कमी होत जातं. डिसेंवरमध्यें जॉन निकल्सन हा कप्तान वनून दुसऱ्या जहाजावर निघून गेला. त्याच्या जागेवर विल् लेमन आला. धष्ट-पुष्ट, आनंदी, तांवड्या केसांचा गाय शाफर हा विल काउहिलच्या जागेवर डायव्हिंग ऑफिसर म्हणून आला. डेव्ह वॉयड् हा नवा मुख्य इंजिनियर वनला. गेल्या ऑगस्ट-मध्यें ध्रुवाकडील वर्फाखालून आर्क्टिकमधून ज्यानीं स्केट नेली तेच सर्व लोक आतां स्केटला हिवाळ्यामध्यें त्याच आर्क्टिकमधून ध्रुवाकडे नेणार होते—कमी आहे तो एक निकल्सन. हीं सारीं अनुभवी माणसं वरोवर आहेत ही एक भाग्याची गोष्ट होती. सर्वांचा विश्वास आणि एक दिलानं काम करणं याची आवश्यकता होती.

मधल्या वेळांत नागरी-तज्ज्ञ 'स्केट'वर जमूं लागले. त्यापैकीं वाल्डो लायन हे एक. ते प्रख्यात शास्त्रज्ञ असून १९४७ पासून पाणवुडीतून आर्क्टिकमध्यें जात आले आहेत. वेंडिक्स कॉर्पोरेशनमधील हुषार, हसतमुख आणि भरपूर कामाचा उरक असणारा तरुण इंजिनियर क्रॅमर वाक हा आमच्या टेलव्हिजन यंत्रणेवर काम करण्यासाठीं आला. यापूर्वी पाणवुडीमध्यें हलता टेलव्हिजन कॅमेरा कुणी ठेवला नव्हता. त्यामुळें तो वापरण्यांतील तांत्रिक अडचणींचा विचार करण्यांत क्रॅमर गढून गेला होता.

हिवाळ्यांत कित्येक वेळां आमचे वैद्यकीय अधिकारी डॉ. अर्नेस्ट आणि डेव्ह वॉयड् – हे दोघेही पाण्यांत वुड्या मारून संशोधन करण्याचें शौकीन आहेत—हे म्हणाले होते कीं पाण्याखालीं असतांना वर्फशीलांच्या दावाची परीक्षा घेणारी यंत्रणा स्केटवर असावी. शेवटीं वॉयड्, डॉ. अर्नेस्ट आणि इतर दोघे अशा चौघांनीं वॉशिंग्टन येथील डायव्हिंग स्कूलमध्यें जाऊन दोन आठवडे परिपूर्ण असं शिक्षण घ्यावं अशी सोय करण्यांत आली.

ते जे परत आले ते पाव इंच जाडीचे काळ्या रंगाचे स्पंज-रवर कापडाचे सूट घेऊन. त्या कपड्यानीं चेहऱ्याव्यतिरिक्त इतर सारं शरीर झाकलेलं असायचं. स्पंज-रवर हा पाणी शोषून घेतो व तिथंच ठेवतो आणि मानवाच्या शरीरांतील उष्णतेनं तें पाणी गरम होतं व वर्फाळ समुद्रांत, त्या वर्फाच्या थंडीपासून शरीराचं रक्षण करतं. ती थंडी, शरीरापर्यंत पोचतच नाहीं.

आम्ही निघण्याच्या थोडे दिवस अगोदर वॉल्ट विटमन येऊन आम्हांला मिळाला. त्यानें वरोवर आर्क्टिक वाङ्मयाचा ढीगच्याढीग आणला होता.

आणि शेवटीं जहाजावर टेलव्हिजन यंत्रणा वसविण्यांत आली. नवा आइस फॅदोमीटर आणला व वसविला. नवे फ्लड-लाइटस् वसविले. त्यांचा उजेड सर्व आर्क्टिक खाडी झगागून सोडेल असें वाटे. आमच्या देशाच्या संपत्तीनें आम्हांला जे जे देणं त्यांना शक्य होतं ते तें त्यानीं दिलं होतं. आतां आम्हीच कर्तवगारी दाखवायची होती.

उत्तर ध्रुव आणि त्याच्या पलीकडे जाण्या-साठीं सात महिन्यांत दुसऱ्यांदा स्केट निघाली होती. आणि शिल्लक राहिले होते ते निरोप. नॅन्सीचं व माझं लग्न झालं त्या गोष्टीला सतरा वर्षं झालीं, पण हा निरोप घेण्याचा नवा प्रसंग दोघां-नाहि माझ्यापेक्षां जड वाटतो. पतिपत्नींना शेवटचे दिवस विरहांत सहन करतां येतात व दिलासा वाटतो तो अनुभवाला जी अर्थ-पूर्णता येते तिच्यामुळें. काळ निघून जातो आणि शेवटीं परत येण्याचा अनुभव फार गोड असतो.

पण मुलांच्या वावतींत तसं नसतं. त्यांना 'गुडवाय्' म्हणजे फक्त 'गुडवाय्' त्यांच्या शौर्यशील तरुण वृत्तीमुळें ती फारशीं वोलत नाहींत. माझा तीन वर्षांचा छोकरा चार्ली—त्याचा निरोप घेतांना माझं हृदय फुटतंय् कीं काय असं वाटलं. जेव्हां सारे निरोप समारंभ पार पडले तेव्हां तो अड-खळत अडखळत वाहेर मोटारीकडे आला. त्याचा विश्वासमुक्त चेहरा माझ्याकडे करीत तो मला म्हणाला, 'डॅडी यावेळीं तुम्ही जास्त दिवस वाहेर रहाणार नाहीं ना? परत लौकर याल ना ?'

आणि मग मागे उभी असलेली नॅन्सी—आपल्या अश्रूना आवरावयास असमर्थ ठरली.

(क्रमशः)


दिवाळीची तयारी



तूं म्हणत होतीस कीं, तुझं माझ्यावर प्रेम आहे—
आणि मी विचारीत होतों "प्रेम म्हणजे काय ग?"
तुलाही तें नीटसं सांगतां आलं नाहीं.
तूं नुसतं म्हणालीस 'ऊं !'
त्या उद्‌गारांत कांहीं अर्थ नव्हता आणि होताही—

**संध्या** छाया आतां क्षितिजाखालीं घसरूं लागल्या. पश्चिमेला रेशमी किरणें जाळीं विणूं लागलीं. सारीकडे एक कुंद आणि उदास भाव संचारूं लागला. झाडांच्या दूरवर सांवल्या जमिनीवर रेघोट्या मारूं लागल्या. अन् निळ्या गर्द आकाशाची पर्वताशीं लगट सुरूं झाली.

सलगीनं तूं मला म्हणत होतीस —
'प्रेमाच्या माझ्या राज्यांत तुलाच सिंहासन आहे रे !' पण खरं सांग !

प्रेम म्हणजे काय ग ?

दोन दृष्टींचं मीलन का ! शब्दांच्या रंगानं रंगलेलं चित्र का ?
"ऊं !"

तुला कांहींच कळलं नव्हतं एकूण ! हृदयाबाहेरचं स्मित मात्र उगाच काव्य लिहित होतं. अन् अंतःकरणाचे पडसाद कुणालाच दिसत नव्हते.

तूं मला म्हणत होतीस कीं,
"तुझं माझ्यावर प्रेम आहे."

शब्द तुझे मादक होते. नाजुक होते तुझे भाव ! तुझ्या सोनेरी भावांनीं माझं मनही फुलवलं होतं पण —

झकास अतृप्ततेंत पुनः भर पडत होती.

तूं मला म्हणत होतीस – खूप खूप तूं बोलतच होतीस.

चेहऱ्यावर स्मिताची झिलई चढवीत तूं तो अधीकच गोड करीत होतीस. तुझ्या स्मितांतच मी मग मूर्ति कोरीत होतों.

भंगलेल्या मूर्ति !
जीर्ण देवळं !

सारी तुझ्याच त्या स्मितांत भस्मसात् होणार होती. तुला आठवतं का ?

हिंवाळ्यांतली धुकाळलेली ती मधुर संध्याकाळ ! थरथरणाऱ्या वातावरणावर सूर्याचे सोनेरी टांके कांहीसं गीत विणीत होते. तूं मला विचारीत होतीस —

'तुझं माझ्यावर खरंखुरं प्रेम आहे का ?'

वेडे, प्रेम म्हणजे सौंदर्याच्या पटावरचा कशिदा नव्हे, स्वप्नांच्या रुजाम्यावरली नक्षीही नव्हेच नव्हे —

तुला समजत तर होतं सारं कांहीं.

उमजतही होतं — पण — —

तुझ्या डोळ्यांतील भाव प्रेमाला फुलवतील. पण आत्म्याची हांक ते कसे ग ऐकतील. शब्दांना सामर्थ्यच नव्हतं त्याला तूं तरी काय





अनुक्रमणिका

# खेळ चालला नशिबाचा

श. दि. चरेगांवकर

करणार! तूं म्हणत होतीस. शब्दांच्या पलीकडल्या भाषेंतच तूं बोलत होतीस —

उन्हाच्या रखरखीत आगींत उष्ण सुस्कारे टाकीत मी जात होतों. डोळ्यांवर निखारे सांडत होते. शंकराच्या तिसऱ्या डोळ्यांतली आग वर्षत होती.

मी आग पीतच जात होतों. आगींत पिचत होतों. असह्य तळपणाऱ्या आगीचे झोत मला पोळत होते.

तुला वाटलं —

याच क्षणीं मला अमृतांची जरुरी आहे. मधु स्वप्नांचे पेले माझ्यापुढं धरून तूं मला म्हणत होतीस —

'क्षणांत सांठविलेली दौलत मीच आहे!'

'मीच आहे की, जी मेघांचें सौंदर्य विजलींतून दाखवते' 'मीच आहे की जी डोंगरांचे भाव लहरणाऱ्या ओढ्यांतून वहावते.'

तूं तुझ्या प्रचंड सामर्थ्यानं जग जिंकशील. मग मला काय! मी तर या विश्वांतील एक कळसूत्री बाहुली.

तुला समजलें का?

— पण सांगण्याची तरी काय जरुरी आहे!

कुंद हवा दाटली होती. पावसाची उदासवाणी रिपरिप वातावरणावर खिन्नता आणित होती. काळाकुट्ट ढगांनीं किरणांचे किरमिजी झोत चिंब झाले होते. काळोखाच्या उरांत कसली तरी न सोसवणारी कळ दडून बसली होती.

तुला वाटत होतं कीं, अंधार असाच रहावा. मिनिएरच्या पारव्या प्रकाशांत तुझे वावरलेले भाव स्पष्ट झाले. तुझ्या शब्दांची धांदल मला कळत होती.

शब्दांना महत्त्व नव्हतं —
अर्थालाही नव्हतं!

पण तुझ्या राज्यांत मला आणि माझ्या राज्यांत तुला महत्त्व होतं.

मधुर स्मृतींचे झिरझिरीत पडदे तयार होत होते. शहारलेले तुझे ते शब्द!

तूं मला विचारीत होतीस —
'छान दिसते का रे मी!'
'रविवर्म्याच्या उर्वशीची ऐट माझ्यांत आहे का?'

'माझ्या पायावर बघ जास्वंदीचा रक्तिमा पसरला आहे. चांदण्यांचा चुरा माझ्या डोळ्यांत सांचला आहे. माझ्या तारुण्यांत सारी रात्र एकवटली आहे.

'खरंच सांग मी सुंदर दिसते का?'

सलणाऱ्या व्यथा माझ्या तुझ्याच शब्दांनीं सहन होत होत्या.

तुला वाटलं —
निःशब्दाच्या गाभाऱ्यांत फुलवावी प्रीतीची ज्योत!

आकाशाच्या निळ्या एकांतांत फुलवावी ताऱ्यांची सुषमा पण सांग —

चंदेरी रात्रीच्या चौकटींत तुझ्या भावांची नक्षीदार कमान तिचा मला काय ग उपयोग? —

अव्यक्ताच्या किनाऱ्यावर जळणारी आग समजुतीचे क्षितीज किती काळ रोखणार?

सारे खेळ तुला जमत होते.
डोंबाऱ्याच्या काठीप्रमाणें —
दरवेशाच्या डमरुप्रमाणें —
जादुगाराच्या शब्दांप्रमाणें —

माझी दृष्टि खिळत होती. तुझ्या भुंवयांचें नर्तन आणि शब्दांचे चाळ उगाच मला नाचवीत होते.

शेतांतून ज्वारीचीं कणसं कशी टप झाली होती.
वाऱ्याच्या शांत झुळकी थंड वेदना करीत छळत होत्या.
कणसांचे टपोरे दाणे —
रसदार स्वाद — —
पांखरं येतात!
जातात!
रस चोखतात —
अमीत फक्त तार छेडते —
सूर बधीर होतात. आलाप कातर होतात.
अर्थ शब्दांपासून दूर पळतो.
तरीही —
तूं मला म्हणत होतीस —
कीं —
तुझं माझ्यावर प्रेम आहे!
काळोखाच्या शांतीतून निःशब्दांची कोडीं जुळत होतीं.
उदासवाणे क्षण ढळत होते.
आकाशाच्या उरांत —
गहन तमावर —
ताऱ्यांच्या शब्दांनीं लिहिले गेलेले.
न संपणारें गीत —
न संपणारें दुःख —
न सांधलेले धागे —

सारे त्या काळ रात्रीचे सूचक देखावे होते. काळाकुट्ट अंधाराच्या कुशींतून झाडांचीं तोंडं लपून बसलीं होतीं. बुंध्याजवळच्या पाचोळ्यांतून वाऱ्याची चाहूल स्पष्ट होत होती.

पिकल्या पानांचा कर्णकटु नाद —
त्याहूनही भयंकर —
तुझ्या प्रीतीची साद!
कांचा तडकल्या
आकाश फाटले का ग?
म्हातारी दळत होती —
शब्द घुमत होते —
"खेळ चालला नशिबाचा"
"खेळ चालला नशिबाचा!"

●●●










# विठ्ठल भाऊजींचा सल्ला

**कु. प्रभा जागरणे, विले-पारले**

विठ्ठल भाऊजी, मी ना काल रात्रीं माझ्या एका मित्रा-बरोबर बोरिवलीच्या नॅशनल पार्कमध्यें गेलें होतें. आम्ही तिकडे रात्रीं दहापर्यंत होतों. अगदीं एका बाजूस एकांत जागीं आम्ही बसलों होतों. घरीं आल्यावर आई मला खूप रागावली. विठ्ठल भाऊजी, काल रात्रीं मी करूं नये असं कांहीं केलं का हो खरंच ?

• प्रभाताई, आठवून पहा.

☆ ☆ ☆ ☆

**सौ. बनूताई पाणबुडे, वसई.**

विठ्ठल भाऊजी, 'तुमची आई आणि मी समुद्रांत एकदमच बुडत असलें, तर तुम्ही कुणाला वांचवाल ?' असं मी यांना विचारलं तर ते म्हणाले, माझ्या आईस. त्यामुळें मला फार वाईट वाटलें. मी काय करूं ?

बनूताई, पोहायला शिका लौकर.

☆ ☆ ☆ ☆

**दिलीप एकटे, मुंबई—४**

विठ्ठलराव, माझं एका मुलीवर प्रेम आहे. फार प्रेम आहे. गेल्या दोन वर्षांत मी तिला पुष्कळदां विचारलं, पण अजून ती 'हो' म्हणत नाहीं. कांहीं सल्ला देऊं शकाल का ?

दिलीपसाहेब, तुम्ही तिला काय विचारलंत तें सांगितलं नाहींत मला. प्रश्न काय आहे तुमचा ?

☆ ☆ ☆ ☆

**भीमाबाई लठ्ठे, लठ्ठमपूर.**

विठ्ठलभाऊजी, मी वजनाच्या यंत्रावर उभी राहिलें, कीं कांटा गर्रकन् फिरतो आणि स्प्रिंग 'खर्रर्रर्र' असा मोठा आवाज होऊन तटकन् तुटते. मला माझं वजन करायचं आहे. कसं करूं मी माझं वजन ? (मी सध्यां राहायला मुंबईला आहे. चार दिवस. तिकडचाच पत्ता देत आहे.)

भीमाबाई, मुंबईच्या राणीच्या बागेंत हत्तींचं वजन करण्याचं एक यंत्र आहे. तिथल्या चालकांची परवानगी घेऊन त्या यंत्रावर वजन करून पहा. आणि किती वजन होतं तें मला जरूर कळवा, बरं का. एकंदर प्रकरणाबद्दल मला फार उत्सुकता लागून राहिली आहे.

☆ ☆ ☆ ☆

**प्रकाश पेठे, बोरिवली.**

विठ्ठलराव, मीनाकुमारी नांवाची नटी आहे ना, तिच्यावर माझं फार फार प्रेम बसलंय्. मी तिला लग्नाबद्दल विचारूं का?

प्रकाश पंत, माझं सुद्धां त्याच नटीवर प्रेम बसलं आहे. तुम्ही तिला जरूर विचारा. ती 'नाहीं' म्हणाली (बहुतेक तसंच म्हणेल ती) तर मग माझ्यासाठीं शब्द टाका तिच्याकडे. ती 'नाहीं' म्हणाली (बहुतेक तसंच म्हणेल ती) तर मग मला येऊन भेटा तुम्ही. आपण दोघे मग गळ्यांत गळा घालून मनसोक्त रडूं या, हं ?

☆ ☆ ☆

**गुंडोपंत गडबडे, गडबडगांव, (जि. गड़बडपूर)**

विठ्ठलराव, मी रोज सकाळीं उठल्यानंतर 'दार' उघडून बाहेर येतांच माझे शेजारी श्री. तोंडफोडे, 'मिस्टर गडबडे, गडबड केलीत तर तोंड फोडून टाकीन !' असें म्हणतात आणि मोठमोठ्यानें हंसूं लागतात. प्रथम प्रथम मला स्वतःलाहि त्याची मौज वाटून मी हंसत असें. पण आतां मात्र मी हैराण झालों आहे. सकाळीं दार उघडून बाहेर येण्याचीहि मला भीति वाटते. हा प्रकार गेले सहा महिने चालूं आहे. कांहीं उपाय सुचविल्यास आभारी होईन.

गुंडोपंत, मी सुद्धां रोज सकाळीं उठल्यानंतर दार उघडून बाहेर येतांच माझे शेजारी श्री. पुंडलीक पायचेपे, 'विठ्ठलऽ तो आला आऽलाऽऽ, मला भेटण्याऽ लाऽऽऽ, असें म्हणून मोठ्यानें हंसूं लागतात. मला अजूनहि या गोष्टीची गंमत वाटून मी त्यांच्या हंसण्यास साथ देतों. या गोष्टीला सहा 'वर्षे' होत आलीं आहेत. पण अजूनहि मी ती गोष्ट मनावर घेतलेली नाहीं. अशा गोष्टी मनावर घ्यायच्या नसतात. तसं बोलून त्यांची फुकटांत करमणूक होत असेल, तर आपलं काय जातं त्यांत ?

☆ ☆ ☆

**बनूताई कंटाळले, कंटाळगांव, (जि. कंटाळपूर)**

विठ्ठल भाऊजी, आमच्या ह्यांनीं किनई दातांच्या कवळ्या बसवून घेतल्या आहेत. आम्ही कुठें पार्टीला किंवा समारंभाला गेलों म्हणजे हे आपल्या दोन्ही कवळ्या काढतात आणि त्या हातांत धरून चिपळ्यांप्रमाणें वाजवून त्या तालावर 'आधीं बीज एकलें' हें गाणें म्हणूं लागतात. सर्व लोक हंसूं लागले म्हणजे 'आपण मोठा विनोद केला असें त्यांना वाटतें आणि ते अगदीं






खूप होतात. मला मात्र ओशाळल्यासारखें होतें. मी या गोष्टीला अगदीं कंटाळून गेलें आहे. कांहीं मार्ग सुचवाल का यांतून ?

वनूताई, एकंदर प्रकार 'ऐकूनच' माझी खूप करमणूक झाली. मग तो प्रकार प्रत्यक्ष 'पाहतांना' किती मौज येत असेल ! या गोष्टींत ओशाळण्यासारखं कांहीं नाहीं. तुम्ही त्यांना विरोध करूं नका. लेट् हिम् हॅव दी फाईन टाईम.

☆ ☆ ☆

**किंचित् राव हडकुळे, हडकपूर.**

विठ्ठलराव, आमच्या हिचा आवाज फार म्हणजे फारच मोठा आहे. एकदां ती हंसत होती तेव्हां शेजारच्या बिऱ्हाडांत पाहुणी आलेली एक मुलगी 'अय्या, आई, ती बघ म्हातारी गडगडायला लागली. आतां पाऊस पडणार !' असें आपल्या आईला म्हणाली. बोलतांना तोच प्रकार. एकदां माझ्याशीं बोलत असतांना तिला ढेकर आला तेव्हा त्या 'फोर्स'मुळें मी इतक्या जोरांत उडवला गेलों कीं, उघड्या दारांतून बाहेर जाऊन जिन्यावरून गडगडत खालीं गेलों. एकदां दारांत आलेल्या भिकाऱ्याच्या अंगावर जाण्यासाठीं ती आमच्या मोत्याला 'छू: !' असें म्हणाली. मोत्या त्याच्या अंगावर जाण्यापूर्वींच त्या 'छू:'च्या वाऱ्यानें तो भिकारी उडवला गेला आणि रस्त्या 'पलीकडील' गटारांत जाऊन पडला. तिच्या निदान आवाजावर कांहीं उपाय सुचवाल का ? आवाज मोठा करणाऱ्या लाउडस्पीकरप्रमाणें आवाज शोषून घेणारें एखादें यंत्र बाजारांत मिळतें काय ?

किंचित् राव, तसें यंत्र बाजारांत मिळतें. त्याचा वरील सर्व गोष्टींवर उपयोग होईल. पण तें यंत्र त्यांच्या घशांत घालायचें कसें हें मात्र तुम्हांला पाहावें लागेल. (मांजराच्या गळ्यांत घंटा कोण बांधणार ? या प्रकाराप्रमाणें) त्या यंत्राला 'मुसळ' असें म्हणतात.

☆ ☆ ☆

**शैला कुरकुरे, विले-पारले.**

विठ्ठल राव, काल मी कॉलेजमधून घरीं परत येत होतें ना, तर येतांना किनई, माझं पेनच मेलं हरवलं कुठें. मी काय करूं आतां ?

शैला ताई, तुमची शाईची दौत मला देऊन टाका.

**—विठ्ठल भाऊजी**














**दीडशे रुपये ! एका साडीची किंमत दीडशे रुपये ! बाजीरावांनीं हिशोब केला "दीडशे रुपयांत एकादी म्हैस विकत घेतां येईल" त्यांचें म्हणणं खोटं नव्हतं. असं असूनही त्यांनीं ती दीडशे रुपयांची साडी विकत घेतली. कां ?**



**दुपारच्या** वेळीं "न्यू एम्पोरियम्" मध्यें गिऱ्हाईकांची वर्दळ थोडी कमी होती. त्यामुळें तीं दोघं पायऱ्या चढून वर येतां येतांच अंजलीच्या दृष्टीस पडलीं. वंद दारावरील "पुल्" न वाचतांच म्हातारबुवा जोरजोरांत "पुश्" करीत वाहेर राहिले होते. आंत वसलेला खाकी वेषांतील द्वारपाळ त्यांच्याकडे टक लावून वघत निश्चल वसला होता. दरवाजा ओढून आंत प्रवेश कसा करायचा तें अडाणी गिऱ्हाइकांना दाखवण्याचं काम त्याचं नव्हतं.

सुदैवानें हातांतील पुडकीं सांवरीत एक विजार घातलेली स्त्री दुकानावाहेर निघाली होती. तिनें आंतून दार लोटतांच म्हातारबुवा चलाखीनें आंत घुसले. आंतल्या थंडगार हवेची शिरशिरी लागली तेव्हां त्यांनीं टोपी काढून आपल्या मळकट रुमालानें कपाळाचा घाम पुसला. त्या थंडाव्यानें त्यांना इतकं वरं वाटलं कीं कांहीं काळ पाठोपाठ येणाऱ्या वायकोलाहि ते विसरले.

पण सवंध जन्म त्यांच्या सावलीप्रमाणें त्यांच्या मागोमाग चालणारी ती माऊली आतांहि प्रवेशद्वाराशीं अजिवात झगडा न करतां आंत शिरून एखाद्या नववधूच्या संकोचानें त्यांच्या मागें दोन पावलं उभी राहिली होती.

न्यू एम्पोरियमच्या विविध दालनांत प्रत्येक काऊंटरमागें एक एक विक्रेती तरुणी होती. सर्वांचे वांधे सुडौल, कपडे अद्ययावत्, चेहरे आकर्षक आणि त्यांवर एक एक स्मिताची रेषा ओढलेली. एका कोंपऱ्यांत कोचावर वसून एक अमेरिकन वाई सिगारेट एका हातांत धरून दुसऱ्या हातांतील खुर्द्याचा अर्थ लावूं वघत होती. इतर कांहीं माणसं आपल्याला हव्या त्या वस्तूंच्या मागोव्यांत इकडून तिकडे हिंडत होतीं.

समोर पडलेलीं कर्णभूषणं कांचेच्या कपाटांत वेगवेगळ्या जागीं ठेवून अंजलीनें पुन्हां पाहिलं तेव्हां म्हातारबुवा सपत्निक कोणत्या दिशेला वळावं तें न समजून येणाऱ्या-जाणाऱ्यांच्या मार्गांतच उभे असलेले तिला दिसले.

मग तिच्यानं राहवलं नाहीं. समजा तिचे कोंकणांतले आजोवा आजीला घेऊन उद्यां पॅरिसमध्यें तिच्यासमोर दत्त म्हणून हजर झाले तर अंजली त्यांना ओळख दाखवणार नव्हती का ? नियमभंगाचा दोष पत्करला.

टक् टक् सॅंडल्स वाजवीत आपला कोंपऱ्यांतला काऊंटर सोडून अंजली पुढें आली.

"काय हवं आहे आपल्याला ?" नेहमींच्याच गोड आवाजांत तिनें या पाहुण्या आजोवांना विचारलं.

गेलीं पांच मिनिटं आजोबा घसा खांकरून त्या थंडगार वातावरणांत आपल्या खड्या आवाजानें "काय हो, इथं चंदेरी साड्या मिळतात काय ?" हा प्रश्न फेंकण्याचा विचार करीत होते. पण एकाएकी त्यांचा आवाज आंतल्या आंत ओढल्यासारखा झाला होता. विजारी चढवलेल्या वाया, सिगारेटी फुंकणाऱ्या वाया, तोंडं रंगवलेल्या थेरड्या, आणि नाजुक नाजुक चालणारे वोलणारे पुरुष पाहून थेट दुकानावाहेर रणरणत्या उन्हांत पळ काढावा असंहि त्यांना वाटलं होतं. पण पुन्हां त्या दाराशीं ओढाताण करावी लागली असती. आणि जाणार कोठें ? त्यांना या दुकानाच्या पायऱ्यांशीं सोडून "सावकाश होऊं द्या खरेदी. अर्ध्या तासांत इथेंच येतों तुम्हांला घ्यायला"










# योग्य मेट्रिक परिमाणांत खरेदीविक्री करा

बहुधा जुन्या वजनांचे मेट्रीक वजनांमध्यें सरळ रुपांतर करून वस्तु मागितल्या जातात. उदाहरणार्थ पावशेराकरितां २३३ ग्राम मागितले जातात, तसेंच १ रत्तलाकरितां ४५४ ग्राम मागितले जातात. अशा तऱ्हेनें वस्तु मागणें हें दशमान पद्धतीच्या तत्त्वानुसार नाही. शिवाय यामुळें जुन्या पद्धतीप्रमाणेंच आपणांस किचकट हिशोब करावा लागतो, परंतु दशमान पद्धतीचा एक मुख्य हेतु अशा तऱ्हेची क्लिष्ट आंकडेमोड दूर करणें हा आहे.

वरील उदाहरणांत वस्तु मागण्याची योग्य पद्धत म्हणजे २०० ग्राम, ३०० ग्राम, ४०० ग्राम अगर ५०० ग्राम मागणें

| पूर्वी या मापानें घेत असाल | तर आतां मागा |
|---|---|
| १ औंस (= २८ ग्राम) | ३० ग्राम |
| १ पौंड (= ४५४ ग्राम) | ५०० ग्राम |
| २ पौंड (= ९०७ ग्राम) | १ किलोग्राम (१००० ग्राम) |
| ७ पौंड (= ३.१७ किलोग्राम) | ३ किलोग्राम |
| १४ पौंड वा स्टोन (= ६.३५ किलोग्राम) | ५ किलोग्राम |
| २८ पौंड (= १२.७० किलोग्राम) | १० किलोग्राम |
| ५६ पौंड (= २५.४० किलोग्राम) | २० किलोग्राम |
| ११२ पौंड वा हंड्रेडवेट (= ५१ किलोग्राम) | ५० किलोग्राम |
| १ टन (= १०१६ किलोग्राम) | १००० किलोग्राम |



| | |
|---|---|
| १ तोळा (= ११.६६ ग्राम) | १० ग्राम |
| १/१६ शेर वा छटाक (= ५८ ग्राम) | ५० ग्राम |
| १/४ शेर वा पाव (= २३३ ग्राम) | २०० ग्राम |
| १/२ शेर (= ४६७ ग्राम) | ५०० ग्राम |
| १ शेर (= ९३३ ग्राम) | १ किलोग्राम (१००० ग्राम) |
| २.१/२ शेर (= २.३३ किलोग्राम) | २ किलोग्राम |
| ५ शेर (= ४.६६ किलोग्राम) | ५ किलोग्राम |
| १० शेर (= ९.३३ किलोग्राम) | १० किलोग्राम |
| २० शेर (= १८.६६ किलोग्राम) | २० किलोग्राम |
| १ मण (= ३७ किलोग्राम) | ४० किलोग्राम |
| २,१/२ मण (= ९३ किलोग्राम) | १ क्विंटल (१०० किलोग्राम) |

**योग्य रीतीनें मेट्रिक पद्धतीचा अवलंब करा**

**कृषि संचालक, महाराष्ट्र सरकार, मुंबई**





अनुक्रमणिका

असं सांगून त्यांचा भाचा गायब झाला होता. हरामखोर बेटा ! कसलं दुकान पण काढलं शोधून. आंत माणसं उभीं आहेत तीं हाडामांसाचीं, कीं मेणाचीं ? अल्ल्या बारामतींत औषधाला शोधून सांपडलीं नसतीं.....

एक मेणाची बाहुली बाजीरावांच्या समोर उभी राहून त्यांना पुन्हां विचारीत होती, "काय घ्यायचं आहे आपल्याला ?"

घराच्या ओसरीवरून रस्त्यानें चाललेल्या पाटलाला हटकावण्याचा आवाज किंचित् खालच्या पट्टींत आणून बाजीराव म्हणाले, "यांच्यासाठीं चंदेरी साडी हवी. अगदीं उत्तम पोताची. पैशांचा प्रश्न नाहीं."

अंजली म्हणाली, "या, मी दाखवतें कुठं जायचं तें. जातां जातां शेजारच्या बाघमारेला तिनें खूण केली.–"जरा माझ्या जागेवर लक्ष ठेव–अं ?"

• म्हातारबुवा पत्नीसह लिफ्टमध्यें चढले. वरच्या मजल्यावर पोंचतांच पुन्हां गोंधळांत पडावं लागलं नाहीं. अंजलीनें हें जोडपं सुभद्रेच्या हवालीं केलं, आणि ती लगबगीनें खालीं परतली.

समोर कॅश घेतां घेतां चष्म्याच्या कांचांमागें नटवरलालचे डोळे चकाकत होते. नेमलेली जागा सोडून इथें तिथें हिंडण्याबद्दल जर त्यानें संध्याकाळीं विचारलं असतं, तर कोणत्या शब्दांत उत्तर द्यायचं हें अंजलीला आतांपासून ठरवायला हवं होतं.

वरच्या मजल्यावर चंदेरी साड्यांच्या घड्या एकामागून एक उलगडून सुभद्रा दाखवीत होती. एक अंजिरी साडी बाजीरावांना पसंत पडली.

"याची किंमत काय ?" त्यांनीं विचारलं.

"एकशें पन्नास रुपये."

"काय म्हटलंत ?"

"एकशें पन्नास—जास्त नाहीं. नऊवारी साडी हवी ना ? शिवाय पोत तर बघा."

बाजीरावांनीं बायकोकडे पाहिलं आणि बायकोनें बाजीरावांकडे. एकशें पन्नासांत एकादी म्हैस येऊं शकेल. एका पातळासाठीं इतके रुपये ओतायचे?

"नको बाई. भलतंच महाग मला नको." बायको निश्चयी आवाजांत म्हणाली. "दुसरें पातळ दाखवा" बाजीराव म्हणाले. पण कोणतीच साडी त्यांच्या मनाला येईना. हिरवी, लाल, पोपटी, निळी चौकट, पांढरी बुट्टी, कांहींच आवडेना.

पुन्हां पुन्हां दोघांचीहि नजर त्या दीडशें रुपये किंमतीच्या अंजिरी साडीकडेच जात होती.

"जरा धरून बघ ग अंगाजवळ"

"हो, हो, बघा समोरच्या आरशांत. रंग शोभतो मांपशी तुम्हांला. हा एकच नग शिल्लक आहे या साड्यांपैकीं"

"किंमत फार आहे हो—नकोच इतकं महाग." बायको पुन्हां म्हणाली. बाजीराव जरा विचारांत पडले. नंतर बायकोकडे बघत म्हणाले,

"द्या–हेंच द्या बांधून."

सुभद्रेनें बिल् तयार केलं आणि विचारलं,

"पैसे इकडे देतां का ? खालीं थांबावं लागेल."

बाजीराव म्हणाले "साडी कुठें ?"

"ती खालीं मिळेल. 'पार्सल काऊंटर अशी पाटी आहे, तिथें हा कागद दाखविलांत कीं मिळेल."

पट्दिशीं दीडशें रुपये द्यायचे, आणि नाहीं दिले म्हणाली तर ? पण तोंडावरून संभावित दिसते आहे. मंगळसूत्र आहे गळ्यांत, या विश्वासानें बाजीरावांनीं पैसे दिले. सुभद्रेनें त्यांना ब्रह्मघोटाळ्यांतून पुन्हा लिफ्टपर्यंत आणून सोडलं.

नटवर शहाला उत्तर काय द्यायचं तें आतांपर्यंत अंजलीनें घोकून पाठ केलं होतं. यावेळीं आजोबा आणि आजी खालीं उतरलेले दिसतांच समोरच्या ग्राहकांना "एक मिनीट थांबा हं" असं सांगून ती पुढें धांवली.

या रांगेंत थांब, त्या रांगेंत थांब, असं करतां करतां पुडकं अखेरीस बाजीरावांच्या हातीं मिळालं, त्यावेळीं त्यांचा भाचा दुकानांत शिरला.

भाच्यामागून हळूहळू चालत बायको दुकानाबाहेर पडली, पण बाजीराव मागें परतून अंजलीच्या काऊंटरकडे कर्रर्र कर्रर्र वाहणा वाजवीत आले.

"मुली, फार मदत झाली तुझी" म्हातारा म्हणाला.

"हवं तसं पातळ मिळालं कां आजीबाईंना? अंजलीनें विचारलं.

"अग दीडशें रुपये मोजले. कमी नाहींत. ती नकोच म्हणत होती." बाजीरावांनीं आपला घोगरा आवाज शक्य तितका खालीं आणून अंजली आणि भोंवतालचं न्यू एम्पोरियम् यांमध्यें एक अदृश्य पडदा निर्माण केला, आणि तिला सांगितलं.

"जन्मांत पैसे उडवले नाहींत असे. पण अलिकडे तिला दिसत नाहीं नीट. तिला माहीत नाहीं, पण डॉक्टरनें सांगितलं आहे दृष्टी जाणार तिची. तेव्हां म्हटलं बघूं शकते तोंवर हौस पुरवावी एक. शिवाय पोत उत्तम आहे. नुसता हात फिरवीत बसली, तरी बरं वाटेल." (आधारित)

—ललित वालावलकर

• • •

कारागिरी !



वा ! वा ! तुमची काम करण्याची पद्धतच बाकी और आहे !









**वि. रा. भाटकर**

*"एखादा रुपया आहे का ?" म्हणून कुणीं विचारलं तर अनेक 'एखादे' रुपये पाकिटात असूनही मी दचकतों, चेहऱ्यावर खोटी खंत वागवीत म्हणतों "सॉरी हं !" ती व्यक्त करीत असतांना मनांत मात्र एक खंत बोचत असते. कसली ?*

*—त्यासाठींच तर ही गोष्ट वाचायची !*

**माझा** मित्र अरविंद माझें एक रुपया देणें लागतो. वर्षापूर्वी त्यानें तो माझ्याकडून उसना घेतला होता आणि आतां तो तो परत करील असें मला वाटत नाहीं. आमची जेव्हां जेव्हां भेट होते तेव्हां तो माझें एक रुपया देणें लागत आहे ही गोष्ट तो अजिबात विसरून गेल्याचें माझ्या लक्षांत येतें. तो नेहमीं मला पूर्वीप्रमाणेंच अगदी मोकळे-पणानें भेटतो. माझा रुपया त्याच्या मनांतून अगदीं साफ निघून गेला आहे. तो आतां कधींहि परत मिळणार नाहीं याबद्दल मला कांहीं शंका नाहीं.

उलटपक्षीं, अरविंद माझें एक रुपया देणें लागतो ही गोष्ट मी मरेपर्यंत विसरणार नाहीं हें मला चांगलें ठाऊक आहे. त्यामुळें आमच्या मित्रत्वाला कांहीं बाध येणार नाहीं ही गोष्ट खरी, पण मी ती गोष्ट कधींहि विसरूं शकणार नाहीं. इतर लोकांचा या बाबतींत काय अनुभव आहे मला कल्पना नाहीं, पण माझ्याकडून कुणी जर कधीं एखादा रुपया उसना घेतला तर ती गोष्ट मी ताटीवरून स्मशानांत जाईपर्यंत विसरणार नाहीं याविषयीं मला अगदीं खात्री आहे.

काय झालें तें तुम्हांला सांगतों. अरविंदनें तो रुपया माझ्याकडून गेल्या वर्षी एप्रिलच्या आठ तारखेला उसना म्हणून घेतला. (चुकून कां होईना पण कधीं काळीं हें अरविंदच्या वाचण्यांत येईल या हेतूनेंच मी ही तारीख देत आहे.) त्यावेळीं तो कोल्हापूरला चालला होता. टॅक्सीचें भाडें देण्यासाठीं त्याला एक रुपया हवा होता आणि तो मी त्याला दिला. हें सारें अगदीं सहज घडलें होतें. तें घडेपर्यंत हें सारें घडतें आहे याची मला पुसटशीदेखील कल्पना नव्हती. तो म्हणाला, "एखादा रुपया आहे का तुझ्याकडे सुटा ?" आणि मी म्हणालों, "हो, आहे ना. एक रुपया पुरे ना ?" मला वाटतें — वाटतें कशाला, माझी अगदीं खात्री आहे कीं त्यावेळीं तो रुपया त्यानें केवळ उसना म्हणूनच घेतला होता. नंतर तो परत करण्याचा त्याचा विचार होता.

कोल्हापूरला गेल्यानंतर त्यानें मला एक पत्र पाठविलें. लिफाफ्यांत एका रुपयाची नोट असेल असें मला वाटलें. पण तो उघडून पाहिल्यानंतर त्यांत ती नसल्याचें मला आढळून आलें. "येथें दूध फार स्वस्थ मिळतें. कांहीं ठिकाणीं तर निर्भेळ दूध रुपयाला दोन शेर मिळतें." असें त्यानें पत्रांत म्हटलें होतें. 'रुपयाला' या शब्दामुळें क्षणभर माझी दिशाभूल झाली.

अरविंद पंधरा दिवसांनीं परत आला. मी त्याला भेटण्यास स्टेशनवर गेलों— त्या रुपयासाठीं नाहीं, तर केवळ तो माझा मित्र आहे म्हणून. पंधरा दिवसांनीं परत आल्यानंतर स्टेशनवर कुणीतरी आपल्याला न्यायला आलें आहे हें पाहून त्याला बरें वाटेल याच कल्पनेनें मी म्हणालों, "टॅक्सी करून जाऊंया आपण." पण तो म्हणाला, "नको. चालतच जाऊंया. कांहीं घाई नाहीं आतां एवढी."

तो सारा दिवस आम्ही बरोबरच होतों. कोल्हापूरबद्दलच बोलत होतों. मी त्या रुपयाचाच विचार करीत होतों. पण त्याचा स्पष्ट उल्लेख मात्र मी केला नाहीं. तसा उल्लेख करणें शक्य नव्हतें. कोल्हापूरला ऊंस स्वस्त मिळतात असें म्हणतात तें खरें का, रुपयाला किती मिळतात असें मी त्याला विचारलें. (रुपया या शब्दावर मी मुद्दामच थोडा जोर दिला.) पण या अप्रत्यक्ष उल्ले-खाचा देखील कांहीं उपयोग झाला नाहीं.

अरविंद त्या रुपयाची गोष्ट अजिबात विसरून गेल्याचें कांहीं काळानें माझ्या ध्यानांत आलें. कोल्हापूरच्या प्रवासाला टॅक्सीचें भाडें वगैरे धरून एकूण किती खर्च आला असें मी त्याला एकदां विचारलें. तो म्हणाला, 'मी हिशेब ठेवला नाहीं.' 'प्रवासाचा कांहीं त्रास वगैरे झाला नाहीं ना, नेहमींचा जीवनक्रम पुन्हां पूर्वीप्रमाणें सुरळीत चालू झाला का' असेंहि मी एकदां त्याला विचारलें तो म्हणाला, 'खरं सांगायचं म्हणजे मी त्याबद्दल जवळ जवळ सर्व कांहीं विसरून गेलों आहे.' म्हणजे आतां सारें आटोपलें आहे हें तेव्हां माझ्या ध्यानांत आलें.

मात्र या साऱ्या प्रकाराबद्दल मी अरविंदला दोष देत नाहीं. माझ्याकडून एक रुपया नुसता घेऊन तो विसरून गेलेल्या अशा अनेक लोकांच्या यादींत मी त्याचें नांव टाकून दिलें आहे. असे माझे अनेक मित्र आहेत. त्यामुळें माझ्या त्यांच्याशीं वाग-ण्यांत कांहीं फरक होत नाहीं, पण ती गोष्ट मी विसरलों तर बरें होईल असें मला नेहमीं वाटतें.








अरविंद आणि मी एकमेकांना नेहमीं भेटतों. दोन दिवसांपूर्वींच आम्ही रात्रीं एका हॉटेलांत बरोबरच जेवलों. जेवतांना तो अहेतुकपणें कर्जाविषयींच बोलत होता. 'आपण अमेरिकेकडून कर्ज घेतलें तरी तें फेडणें आपल्याला फार कठीण जाईल.' असें काहींतरी तो म्हणाला. 'हो ना, कोटयवधि रुपयांचा प्रश्न आहे. एखाद दुसरा रुपया उसना म्हणून घेतला तर गोष्ट वेगळी आहे.' असें मी म्हणालों. आतां यावरून तरी त्याला आठवण व्हावी कीं नाहीं ? पण छे ! रामा, शिवा, गोविंदा.

पण आजकाल एक विचार – एक दुःखद विचार माझ्या मनांत अधून मधून येऊं लागला. तो असा. अरविंद माझें एक रुपया देणें लागतो. आणि ती गोष्ट तो साफ विसरून गेला आहे. त्याचप्रमाणें असे पुष्कळ लोक असतील, ज्यांच्याकडून मी एक एक रुपया उसना घेतला असेल आणि ती गोष्ट मी अजिबात विसरून गेलों असेन. या गोष्टीचा मी जितका जास्त जास्त विचार करतों तितका मी जास्त कष्टी होतों. कारण मी जर त्या रुपयाविषयीं एकदां विसरून गेलों असलों तर मरेपर्यंत मी तो परत करणार नाहीं याविषयीं मला अगदीं खात्री आहे.

अशा लोकांना माझें एवढेंच सांगणें आहे कीं त्यांनीं तसें मला अगदीं स्पष्ट सांगावें. म्हणजे सर्वांनीं एकदम नव्हे तर थोडया थोडया लोकांनीं मिळून. मी तावडतोब त्यांचीं नावें एका कागदावर लिहून घेईन. म्हणजे ब्रिज खेळतांना कुणी मला एखादा रुपया उसना दिला असेल किंवा कधीं क्लबमध्यें सोडा घेण्यासाठीं कुणीं मला तीन आणे उसने दिले असतील अशा लोकांची मी या यादींत गणना करीत नाहीं. त्यांच्याबद्दल मी मुळींच विचार करीत नाहीं. (किंवा तसा विचार न करण्याचा प्रयत्न करीत आहे.) पण मी कधीं कोल्हापूरला जात असतां टॅक्सीचें भाडें देण्याकरितां म्हणून कुणी मला एखादा रुपया उसना दिला असेल तर तो परत करण्याची माझी इच्छा आहे. फार प्रखर इच्छा आहे.

[ स्टीफन लीकॉक यांच्या 'माय लॉस्ट डॉलर' या लेखावरून. ] ●●●

( पान २६ वरून )

पडद्यावर क्लार्क गॅबल नायिकेस उद्देशून म्हणतो, 'प्रिये! जीवनाप्रमाणें मृत्यु हाहि नैसर्गिकच आहे म्हणून त्याला भिणें हें केव्हांहि चूकच होईल. मृत्यूला जो भितो त्यानें वास्तविक जीवनालाहि भ्यायला हवें! या संवादाच्या चित्रिकरणाच्या वेळीं भवितव्यता हंसत तर नव्हती ना?

* * *

हॉलिवूड येथील सॅन फर्नांडो व्हॅलीमधील आपल्या प्रशस्त बंगल्यांतून पत्रकारांना दिलेल्या एका मुलाखतींत गॅबलनें एक आनंदाची बातमी जाहीर केली. ही बातमी सांगतांना त्याला आनंदाचें भरतें आलें होतें. तो म्हणाला, 'वयाच्या साठाव्या वर्षी, म्हणजे खरें, उशीराच मी आतां पिता होणार आहे. माझी अपत्यांची हौस दैव इतक्या उशीरा पुरी करीत आहे म्हणूनच मी भाग्यवान आहे असें मला म्हणतां येईल ! माझ्या निधनानंतर, माझ्या थडग्यावर, मला वाटतें, असें लिहितील कीं, एक नशिबवान माणूस– ज्याला आपलें नशिब 'शिकंदर' आहे हें ठाऊक होतें !'

दुर्दैवाची गोष्ट कीं आपल्या मुलाच्या जन्माच्या कांहीं दिवस अगोदर चित्रतारा क्लार्क गॅबल १६ नोव्हेंबर १९६० ला रात्रीं अकरा वाजतां हृदयविकारानें मृत्यु पावला. दहा दिवस अगोदर त्याला या विकाराचा सौम्यसा पहिला झटका आला होता परंतु अपचनामुळें कांहीं त्रास झाला असेल म्हणून तिकडे त्यानें दुर्लक्ष केलें. सर्दी, पडसें, ताप, खोकला असे किरकोळ स्वरुपाचे आजारसुद्धां त्याला माहित नव्हते इतक्या कणखर प्रकृतीचा गॅबल, हृदयविकाराचा दुसरा झटका आल्यावर आयुष्यांत पहिल्यानें आडवा पडला. हॉलिवूडच्या प्रख्यात प्रेस्बेटेरिअन हॉस्पिटलमध्यें त्याला तावडतोब हलविण्यांत आल्यावर, निष्णात डॉक्टरांच्या वैयक्तिक देखरेखीखालीं उपचार सुरूं होऊन त्याच्या प्रकृतीला दिवसें दिवस आरामहि पडूं लागला. के गॅबल अहोरात्र त्याच्या जवळ बसून होत्या. डॉक्टराच्या मतें, 'धोक्याची वेळ' निघून गेली होती आणि 'कांहीं दिवसांच्या विश्रांतीचा'चा काय तो प्रश्न होता. प्रमुख वर्तमानपत्रांमधून त्याच्या आजाराच्या बातम्या पहिल्या पानावर ठळक टायपांत छापल्या जात होत्या. शेंकडों तारा, पत्रें येऊन थडकत होतीं. अमेरिकेचे प्रेसिडेन्ट आयसेन हॉवर यांची एक खास तार तांतडीनें आली होती, त्यांत म्हटलें होतें, 'चिंता करूं नका–लवकर बरें व्हा!' ही तार वाचतांना होणारा आनंद त्याला लपवितां आला नाहीं, कारण, तो ती पुनःपुन्हां वाचीत राही !

या लोकोत्तर कलावंतास श्रद्धांजलि वाहिली जात असतांना चार्लटन् हेस्टन हा प्रख्यात अभिनेता म्हणाला:

एका राजाचें निधन झाल्यावर आणि दुसरा राजा गादीवर येत असतांना, 'राजा मरण पावला–राजा अमर राहो !' अशी ललकारी देण्याची परंपरा इंग्लंडमध्यें आहे. क्लार्क गॅबलच्या निधनानंतर, राजा मरण पावला इतकेंच म्हणून आपण थांबूं या. त्याच्या गादीवर बसण्यास तेवढाच तोलामोलाचा दुसरा कलावंत दिसत नसल्यानें, राजा अमर राहो हें मात्र आपण म्हणूं शकणार नाहीं !

[ छायाचित्रें 'मेट्रो गोल्डविन मेयर'च्या सौजन्यानें. ] ●●●



अनुक्रमणिका







*जगाला 'शहाणे' करून सोडण्याचा बहाणा करणाऱ्या 'छोट्या' माणसांची ही 'मोठी' दुनिया आहे. इथें 'ज्ञान' पिकायच्या ऐवजीं द्वेष पिकतो. 'माणुसकी'चा जयजयकार व्हायच्या ऐवजीं माणसांतल्या क्षुद्रतेला मान-पत्रें मिळतात, आणि तरीही घोष वाक्यें गरजतच असतात—*

*ॐ सह ना ववतु । सह नौ भुनक्तु ।*
*सह वीर्यं करवा वहै ।*



श्रीमान कस्तुरचंद विद्यालयाच्या फाटकांत दामू मास्तर आले, त्यावेळीं शाळेंतील मुलें प्रार्थनेच्या शेवटच्या ओळी म्हणत होतीं. शाळेचे हेडमास्तर ऑफिसच्या दारांत दोन्ही हात पँटच्या खिशांत घालून निर्विकार मनानें उभे होते. शाळेंत साडेअकरा तें साडेपांच पर्यंत रतिबानें काम करणाऱ्या पंचवीस शिक्षकांची पलटण व्हरांड्यांत एका रांगेत स्तब्ध उभी होती. दामू मास्तरांनीं खालच्या नजरेनें एका क्षणांत एकवार सगळ्यांकडे पाहिलें. सारे जण यंत्रासारखे उभे




## प्रा. प्रभाकर बिडवे

होते. अजून पांच मिनिटांनीं सारीं यंत्रें सुरूं होणार होतीं. परमेश्वराच्या प्रार्थनेंत मग्न असलेल्या राष्ट्राच्या भावी पिढी जव-ळून जातांना दामू मास्तरांच्या एकदम लक्षांत आलें कीं, आपणाला पांच मिनिटें उशीर झालेला आहे आणि मग क्षणांत त्यांनीं ऑफिसच्या रोखानें झरझर पावलें टाकायला—नव्हे, पळायलाच सुरुवात केली!

दारांत उभ्या असलेल्या अंमलदाराकडे पहावयाची छाती त्यांना झाली नाहीं. तें तडक ऑफिसमध्यें घुसलें. मस्टर रोल सही करण्या-साठीं उघडला. नांवासमोर तांबडी रेघ !

दामू मास्तरांनीं गपकन् डोळे झांकले, आवंढा गिळला, कशीतरी सही ठोकली आणि निघाले.

'मिस्टर वागीश्वर !' टेबलावरची घंटा बडवीत कोल्हटकर हेडमास्तर एकदम् खेंकसले.

दामाजीपंत वागीश्वर निमुटपणें साहे-बांच्या टेबलाजवळ जाऊन उभे राहिले.

'हजार वेळा सांगितलं, मला शाळेंत उशीरा आलेलं खपायचं नाहीं म्हणून, पण तुमचं आपलं चाललेलंच आहे. मी इथं मर मर मरतो. साडेअकराला शाळा असेल तर दहा वाजतां येऊन बसतों आणि तुम्ही आपले बाजीरावासारखें येतां डुलत डुलत बारा वाजतां. काय चाललंय् काय तुम्ही?' अंमलदार चढत्या आवाजांत गरजले.

'साहेब, घरीं अडचण होती. पांचच मिनिटं उशीर झाला.' दामू मास्तर केंविल-वाण्या स्वरांत बोलले.

'पांच मिनिटं तरी झाली ना ? तेवढा सुद्धां व्हायला नको. वर्षांतून सगळें दिवस तुम्हांला रजा दिली तरी तुमच्या अडचणी संपणार नाहींत. मला शाळा चालवायची आहे. शाळेचं गोदाम करायचं नाहीं, समजलं! चालाय् लागा कामावर !'

आसपास कोणी ऐकत तर नाहीं ना, हें पहात दामू मास्तर निघाले. ऑफिसच्या दारांत येतांच पुन्हां ते घोटाळले. क्षणभर त्यांनीं विचार केला—'कांहीं झालं तरी कोल्हटकर आपले हेडमास्तर आहेत. सुपीरियर आहेत. असं ते बोलायचेच ! त्यांनीं बोलायचं असतं आणि आपण मुकाट ऐका-यचं असतं. रागावले म्हणून काय झालं ? आपण आपला आनंद कळवायला काय हरकत आहे !'

ते परत ऑफिसांत माघारे आले. त्यांनीं

आपल्या खिशांतील एक पुडा बाहेर काढला आणि साहेबांच्या टेबलावर ठेवला.

"मला मुलगी झाली, त्याची ही वर्फी !' असें म्हणत दामू मास्तर लाचारपणें हंसले.

'अं, त्यांत एवढं काय मोठं झालं ! जगांत कुणाला मुली होत नाहींत वाटतं ? आणि हा ऑफिसमध्यें शो कशाला ? इथं पेशवाई सुरूं आहे असं समजतां कीं काय ? उचला तो पुडा. उचला !' अंमलदार गरजला.

दामू मास्तरांनीं वर्फीचा पुडा चटकन् उचलला. चालायला लागले. त्यांना वाटलें—

'हा माणूस नाहीं हैवान आहे. सारा गांव याला अंमलदार म्हणतो त्याला निश्चितच कांहींतरी अर्थ आहे. याला ना मन ना काळीज ! एखाद्या यंत्रासारखं याचं जिणं ! यंत्रासारखं वागण्यांत याला भूषण. पण यंत्र काम देईनासं झालं म्हणजे फेंकून देतात; पण माणसाचं तसं नाहीं. माणूस म्हणून जगलांत आणि काम करायची शक्ति संपली तर त्याचीं स्मारकं उभी करतात. त्याला फुलाच्या माळा घालतात; पण भाग्य नाहीं याचं ! कुत्र्याच्या मरणानं मरायचा शेवटीं. वांझोट्या निपुत्रिकाला कन्या प्राप्तीचा आनंद काय बोडखं कळायचा ! म्हणे, 'जगांत कुणाला मुली होत नाहींत वाटतं !' हं. पण अडला हरी ! काय उपयोग.... गाढवाचे पाय धरायची वेळ आली.'

विचारांच्या तंद्रींतच दामू मास्तर 'टीचर्स रूम' मधें आले.

दामू मास्तर खोलींत शिरतांच 'या ऽ याऽ' म्हणून साऱ्यांनींच तोंड पसरून त्यांचें स्वागत केलें.

आतां मात्र दामू मास्तरांना आपण मुलीचे बाप झाल्याबद्दल धन्यता वाटली.

'कां फार दिवस रजेवर ? तसं कांहीं नवल विशेष ?' मिस्टर टकल्यांनीं प्रश्न केला.

'चार दिवस ते मॅटर्निटी लीव्हवर होते.' दगडांचें शास्त्र घेऊन बी. एस्सी. झालेल्या एस्. एस्. सी. ला इंग्रजी शिकविणाऱ्या प्रोफेसर शिर्डीकर मास्तरांनीं विनोद केला.

आणि यावर सारेजण खो खो हंसले. 'टीचर्स रूम'च्या कोपऱ्यांतल्या टेबलावरच्या खुर्चीवर बसलेल्या मिसेस् कामत आणि मिसेस् टकले सोडावॉटरची बाटली फोडल्यावर जसा आवाज व्हावा तशा फिदीफिदी हंसल्या.

'हो का ! आम्हांला याची कांहींच वार्ता नाहीं !' जणु कांहीं आपणाला यांतलें कांहींच माहीत नाहीं, असें ढोंग करीत श्री. ढापणे उद्‌गारले.

'अहो सर, गांवाच्या एका टोकाला तुम्ही आणि दुसऱ्या टोंकाला वागीश्वर, कसं कळायचं हे ? आणि या गोष्टी सांगीवांगी कां खऱ्या समजावयाच्या असतात ! अहो, त्याला कांहीं पुरावा नको का ?' खाऊगुल्ले आंबिले मास्तर सूचकतेनें बोलले.

'म्हणजे तुम्हांला असं म्हणायचं की वागीश्वरांनीं सगळ्यांना पावशेर पावशेर वर्फी द्यायला पाहिजे !' मिस्टर टकल्यांनीं मधेंच लुडबुड केली.

'हं, कसं बोललांत ! अहो, त्याच्या खेरीज वागीश्वर मुलीचे बाप झालेले आहेत हें आम्हांला कसं कळायचं ?' ढापण्यांनीं मल्लीनाथी केली.

'अय्या ! अस्सय् होय. मग वागीश्वर सगळ्यांना वर्फी नक्कीच देतील.' सौ. टकल्यांनीं वागीश्वरांवरील आपला विश्वास बिनधोक प्रकट केला.

'पण मी म्हणतों, मुलगी झाल्यावर अशी वर्फीच कां देतात ?' डीन ऑफ दि हिस्ट्री फॅकल्टी श्री. कामत मास्तरांनीं प्रश्न केला.

भलत्याच वेळीं भलताच प्रश्न केल्यामुळें सौ. कामतबाईंनी श्री. कामत मास्तरांच्याकडे अशा कांहीं दृष्टीनें पाहिलें कीं, 'तुम्हांला कांहीं अक्कल आहे का ?' असाच तिच्यांतून अर्थ निघत होता.

इतक्यांत वर्ग सुरूं झाल्याचे टोले पडले. सगळी चर्चा एकदम थंड झाली. दामू मास्तरांनीं टाईम टेबलांत पाहिलें. त्यांना ऑफ होता. एकदम त्यांना बरें वाटले. सारेजण 'टीचर्स रूम'च्या बाहेर पडत होते. बुभुक्षित मास्तरांचा तांडा आपल्या जवळून सरकत आहे, असें दामू मास्तरांना वाटलें. दामू मास्तरांना साऱ्यांची घृणा आली. किळस आली. आपल्या लाडक्या वासंतीच्या नांवाची वर्फी खाण्यासाठीं साऱ्यांच्या जिभा वळवळत आहेत असें त्यांना दिसूं लागले. आपणाला मुलगी झाली याचा कुणालाच आनंद झालेला यांना दिसत नव्हता. आनंद झाल्याचें ढोंग मात्र सारे करीत होते. अंमलदार ? ते तर निर्जीव यंत्रच होते. त्याला तर भावनाच नव्हत्या. तिथें आनंदाचा प्रश्नच नव्हता. पण हे सारे शा. मा. हाडाचे चालते बोलते सांगाडे आपल्या जिभेची हौस पुरवायला ढोंगीपणाचे मुखवटे चढवीत होते. सारे एकाच यंत्राचे निरनिराळे भाग होते ! चोर, लुच्चे, लफंगे, भामटे लेकाचे !

'काय दामूअण्णा बाळ-बाळंतीण ठीक आहे ना ?' श्री बडवे मास्तरांनीं विचारलें.

कठीण खडकांत पाण्याचा झरा लागावा तसें दामू मास्तरांना वाटलें.

'परमेश्वर कृपेनं ठीक आहे !' दामू मास्तर कृतज्ञतेनें बोलले.

बडवे मास्तरांच्या समोर आपल्या मनांतील सुखदुःख सारे बोलून टाकावे असें दामू मास्तरांना वाटले. शाळेच्या या घाणेरड्या वातावरणाचा त्यांना कंटाळा आलेला होता. सहानुभूतीचा स्पर्श जिथें मिळेल तिथें त्यांचें मन धांवत होतें. तिथें त्यांच्या मनाला विसावा वाटत होता. बडवे मास्तरांशीं खूप खूप बोलावयाचें त्यांनीं ठरविलें.

"सत्यमेव जयते – जय हिंद."

शेजारच्या वर्गांतून वर्गशिक्षक वर्गांत आल्यावर घोषणा झाली.

केवढी असत्य गोष्ट विद्यार्थी उच्चारीत होते !

सत्यानें वागल्यामुळें दामू मास्तर कधींच सुखी होऊं शकले नव्हते. निर्भीडपणें आणि प्रामाणिकपणें सत्यासाठीं लढतां लढतां दामू मास्तरांना तीन वेळां शाळा बदलाव्या लागल्या होत्या. हेडमास्तरांच्या तोंडाला तोंड देऊन नशिबाची परीक्षा बघण्याची वेळ तीन वेळां दामू मास्तरांवर आलेली होती आणि आतां या शाळेंत तर सत्याचे सारे विडंबन चाललेलें होतें.

खऱ्या अर्थानें एकही शिक्षक तिथें नव्हता. सारा पोटभरूंचा मेळावा तिथें जमलेला होता. आपले बँकेंतले अकाउन्ट्स वाढावेत म्हणून हेडमास्तरांचे शिस्तीचे सारें ढोंग






होते. पद्धतशीरपणाचा, आणि व्यवस्था–टापटिपीचा शो होता. अन् क्वालिफाईड असल्यामुळें श्री. टकले हेडमास्तरांच्या दाराचे उंबरठे व स्वतःचे तळवे झिजवीत होते आणि अंमलदाराची थुंकी झेलण्यासाठीं दिवसाचे तास चाळीस असते तर बरे झाले असते अशी अपेक्षा करीत होते. वाचनालयाच्या कपाटांत पुस्तकांचे गठ्ठे असावेत तसे ज्यांच्या कवटींत सारे अकलेचे गठ्ठे झाले होते असे आंबिले मास्तर, शाळेच्या अकाउंटस् बाबतींत नुसती दडपादडपी करणारे दडपे मास्तर; जिथें जिथें व्यंग दिसेल तिथें तिथें कावळ्यासारखीं दृष्टी ठेवून टोचा मारणारे ढापणे मास्तर; आपल्या बटलरी इंग्रजीवर खूप होऊन विद्यार्थ्यांना थापा मारणारे शिर्डीकर मास्तर; जगांत श्री. ओतुरकर एवढाच एक इतिहासकार आहे, अशी ज्यांची प्रामाणिक समजूत झालेली आहे ते कामत मास्तर; बैल गाभण आहे असें सुपीरियर म्हणाला तर तो दहा लिटर दूध देतो, असें आपण म्हणावे, असें म्हणणारे जोशी मास्तर–सारे सारे पोटासाठीं लाचार होऊन अंमलदाराभोवतीं पिंगा घालीत होते आणि अंमलदारही त्यांना 'सॅटिस्फॅक्टरी' कामाबद्दल सर्टिफिकेट बहाल करीत होता.

सत्याचा केवढा हा अधिक्षेप ! दामू मास्तर बेचैन झाले. ते ताडकन् उठले. बाहेर आले. व्हरांड्यांत हेलपाटे घालूं लागले. चार पांच मिनिटांतच त्यांना एक नवीन गोष्ट दिसली.

शेजारी कामत मास्तरांचा इतिहासाचा तास चाललेला होता. कामत मास्तर सांगत होते—

'संभाजी व्यसनी होता. अनीतिमान होता. त्याच्या राज्यांत स्त्रियांची अब्रू धोक्यांत होती. तो भयंकर दारूड्या होता.....'

मधेंच एक विद्यार्थी ताडकन् उठला.

'सर, पण तो धर्मवीर होता ना ?' त्यानें विचारलें.

कामत मास्तर बुचकळ्यांत पडले.

त्यांना काय उत्तर द्यावें हें कळेना. धर्मवीर नव्हता असें सांगण्याची त्यांची छाती नव्हती. तसें सांगितलें तर नोकरीवर पाणी










पडेल हें त्यांना माहीत होतें. शाळा चालकांमधें हिंदुत्वाचा अभिमान बाळगणारे कट्टर धर्मवीर होते. शाळा सुटल्यावर एखादा मुलगा ही बातमी सगळ्या गांवांत करील आणि उद्यां.... नकोच ती भयंकर कल्पना !

'तुझं म्हणणं बरोबर आहे. संभाजी धर्मवीर होता. हिंदु धर्माचा तो फार अभिमानी होता.... कामत बोलले.

'पण मग तो दारुड्या होता ना !' विद्यार्थ्यानें शंका काढली.

'हिंदु धर्मासाठींच तो दारू पीत होता.' कामत सरांनीं त्याचें समाधान केलें.

'आणि स्त्रियांची अब्रू सर ?' पुन्हा प्रश्न झाला.

'तीहि धर्मासाठींच....' कामत पुन्हां उद्गारले.

दामू मास्तरांना चक्कर आल्यासारखें वाटूं लागले. सबंध जग अतिवेगानें फिरतें आहे कीं काय असा त्यांना भास व्हायला लागला. हिंदुत्वासकट हिंदू धर्माचा, संभाजीसकट इतिहासाचा, कामत मास्तर मुडदा पाडीत आहेत हें त्यांना दिसलें. दामू मास्तरांना वाटले, 'कशाला हे ? कशाकरिता ? सोडून द्या ना, येत नाहीं तर ! आणि जगतां येत नसेल तर आत्महत्या करा ना !'

पण या साऱ्या गोष्टी अंमलदाराला चालतात. त्याच्या दृष्टीनें सर्व कांहीं बरोबर आहे. कारण सर्व कांहीं त्यानें ठरविलेल्या सांच्यांत चाललेलें होतें. दामू मास्तरांना संस्थाचालक श्री. गाढवे यांचें एक भाषण आठवलें—

'मास्तर म्हणजे एक टांग्याचा घोडा आहे. हेडमास्तर त्याचा सारथी आहे. घाटेपरुळेकर स्कीमप्रमाणें त्याला दरमहा चंदा देण्यांत येतो. त्यानें हा सारथी चालवील तसें चालले पाहिजे.'

दामू मास्तरांनीं आपल्या स्वतःच्या शरीराकडे पाहिलें, आपल्या पाठीवर कसलें तरी जड जड ओझें आहे असें त्यांना वाटूं लागलें. कुणींतरी कशाचा तरी खोगीर आपल्या पाठीवर ठेवला आहे आणि चाबकानें आपल्याला हांकलीत आहे असें त्यांना वाटूं लागले. चालण्यामधें थोडासा बदल झाला तरी पायावर फटके बसत आहेत, असें त्यांना भासूं लागले. मिळणारा चंदा अपुरा आहे व आपण अर्धपोटी आहोंत याची जाणीव त्यांना होऊं लागली.

मध्येंच तास संपल्याचा टोला झाला. दामू मास्तरांनीं टाईम टेबलमध्यें पाहिलें. 'नववी: ब — मराठी...' न कळत त्यांची पावलें नववी ब च्या रोखानें निघाली, आणि ते वर्गांत जाऊन उभे राहिलें.

"माझी कन्या कविता काढा.' त्यांनीं विद्यार्थ्यांना हुकूम केला.

विद्यार्थ्यांनीं पाठ काढला.

**'गाई पाण्यावर काय म्हणुनि आल्या ।**
**का ग गंगा यमुनाहि या मिळाल्या ॥'**

दामू मास्तर हळुं हळूं कवितेच्या अंतरंगांत शिरूं लागले. तसंतसें ते अधिक अधिक समरस होऊं लागले. कवितेंतील कन्येच्या जागीं त्यांना आपली वासंती दिसूं लागली. निसर्गानें तिला भरपूर सौंदर्य दिलेले आहे, तरी तिचे लाड आपण पुरवूं शकत नाहीं. तिचें कोडकौतुक करूं शकत नाहीं. असें त्यांना वाटूं लागले आणि अशा निष्पाप बालकांना परमेश्वर आमच्या सारख्या दरिद्री माणसाच्या पोटीं जन्माला कां घालतो, असें एक मोठें प्रश्नचिन्ह त्यांच्या डोळ्यांत उभें राहिलें.

कुणींतरी आपल्या पाठीवर एक जड जड ओझें घालीत आहे असें त्यांना भासूं लागले. तो खोगीर तर नाहीं ना ? त्यांना शंका आली. त्यांनीं पाठीमागे वळून पाहिले. हेडमास्तर कोल्हटकर त्यांच्या पाठीमागें उभे राहून त्यांचा पाठ पहात होते. अंमलदाराच्या हातांतील पेन्सील एखाद्या चाबकासारखी त्यांना दिसत होती आणि तो ? तो सारथी वाटत होता. आणि ते स्वतः ? खरंच आपण स्वतः कोण आहोंत ? दामू मास्तरांच्या डोक्यांत चक्रें सुरूं झालीं.

शाळेची मधली सुट्टी झाल्याची घंटा झाली. मोकळ्या हवेंत वर्गांच्या पेटचांत कोंडून राहिलेलीं फुलपांखरें भराऱ्या मारायला लागली. दामू मास्तर 'टीचर्स रूम'-मध्यें शिरले. तिथें मघाच्याच साऱ्या बुभुक्षितांची एक भली मोठी पंगत पुन्हां बसलेली होती.

दामू मास्तरांना त्या साऱ्यांची किळस आली होती. दोन पावलें ते त्यांच्यापासून दूरच उभे राहिले. तिथल्या गाद्यावर लोळणारे सारे त्यांना दिसत होते. शेणांत किडे वळवळ करावेत तसें ते सारे त्यांना दिसूं लागले. तशा घाणीचाही तिथला प्रत्येकजण अभिमान धरीत होता आणि श्रेष्ठ कनिष्ठतेची स्वतःची वर्गवारी लावीत होता. एकाच घाणींत जगणारे सर्व जीव होते, पण तुझ्यापेक्षां मला अधिक सुखी कसें होतां येईल याचा प्रयत्न प्रत्येकजण करीत होता. जो तो केवळ आपल्या सुखासाठीं दुसऱ्यावर आक्रमण करीत होता. दुसऱ्याचें रक्त पिऊन स्वतः पुष्ट होत होता.

शिक्षणासारख्या पवित्र क्षेत्रांत लफंगेगिरी आणि लुटारूपणा चाललेला होता. सत्याच्या अधिष्ठानावर उभे असलेले सारे असत्याचा उद्घोष करीत होते. मांगल्याच्या वातावरणांत अमंगलता आणीत होते. निःपक्षपात्याचे हात स्वार्थामुळें पक्षपातानें बरबटायला लागले होते. नीतीच्या बुरख्यांत अनीति लपलेली होती. सुधारकीपणाच्या नांवाखालीं राजरोस रानटीपणा चालला होता. माणसामाणसामधूनच सैतान वावरायला लागला होता आणि ध्येयापासून ढळलेल्यांची, नीतीपासून निखळलेल्यांची, सत्यापासून सुटलेल्यांची, भुकेनें मारलेल्यांची आणि स्वार्थानें सारी सहिष्णुता संपलेल्या साऱ्या पामरांची ती एक प्रचंड दुनिया झालेली होती.

दामू मास्तरांना वाटलें, आपण जगाला ओरडून सांगावें कीं, 'ही एक पामरांची दुनिया आहे. पामरांची दुनिया आहे. ती रोज दुपारी साडेअकराला भरते आणि सायंकाळीं साडेपांच वाजतां सुटते. या दुनियेंत माणसांना जागा नाहीं. माणुसकीला वाव नाहीं.'

पण दामू मास्तर कांहींच बोलूं शकले नाहींत. त्यांना गेल्या वर्षीचा एक प्रसंग आठवला.——

याच शाळेंतल्या सोलापूर आणि धारवाडच्या दोन शिक्षकांनीं या पामरांच्या दुनियेचा परिचय जगाला करून देण्याचा गुन्हा केला. परिणाम म्हणून या पामरांच्या दुनियेंतून त्यांना हुसकून लावण्यांत आले.

दामू मास्तरांना वाटलें, तसेंच माझें झालें तर....

नुसत्या कल्पनेनेंही त्यांना भोंवळ आल्यासारखें वाटले. त्यांना आपल्या पाठीवर कसले तरी ओझे आहे असें वाटूं लागले. त्यांना त्यांच्या पत्नीची आठवण झाली. मुलाची आठवण झाली. नुकत्याच जन्मलेल्या वासंतीची आठवण झाली आणि ते स्तब्ध अगदी यंत्रासारखे स्तब्ध राहिले....

सायंप्रार्थना संपत आली होती. शांत गंभीर आवाजांत मुलें म्हणत होतीं...

ॐ सह ना ववतु । सह नौ भुनक्तु । सह वीर्यं करवा.....

दामू मास्तरांना वाटले, 'सारे सारे खोटे आहे, ढोंग आहे, आपण बोलून दाखविले तर...'

त्यांना पुन्हां भोंवळ आल्यासारखें वाटलें. त्यांनीं गपकन् डोळे मिटले. आणि ते मुलाबरोबर म्हणूं लागले....

ॐ शांति ! शांति !! शांति !!!

• • •








आचार्य अत्रे

## महाराष्ट्राचा थोर "जागल्या"




**महाराष्ट्र** हा मोठा भाग्यवान प्रांत आहे. दगडाधोंडयाच्या ह्या प्रांतांत अमाप पीक येतं. तें पीक कधीं कधीं प्रज्ञेचं असतं. कधीं विविध कलांचं येतं. कधीं कधीं तिथे पराक्रम वरसून जातो तर कधीं सुरांनीं साक्षात् स्वर्ग उभे करणारे यक्षगंधर्व इथें पिकतात, वहरतात. कधीं नव्या इतिहासाचे शिल्पकार हातांत बाँबगोळे, पिस्तुलें घेऊन इथें संचार करतांना दिसतात तर कधीं जगाला मानवतेचा श्रेष्ठ संदेश देणारे संत इथें फार मोठी परंपरा देऊन जातात. महाराष्ट्राचें वर्णन येवढचा थोडया शव्दांत मुळीं करतांच येत नाहीं. मूल्यें मानणारा, जपणारा व नवी मूल्यें निर्मिण्याची धमक अंगीं असणारा हा प्रांत आहे. आणि आजही ती परंपरा खंडित झालेली नाहीं.

ह्या थोर परंपरेनें महाराष्ट्राला दिलेलें एक अमोल देणें (व लेणेंही) म्हणजे आचार्य **प्रल्हाद केशव अत्रे** हे होय! आचार्य अत्रे ही एक विशिष्ट आकाराची, रंगरूपाची, विशिष्ट शैक्षणिक पातळी असलेली, विशिष्ट गुणांनीं मण्डित झालेली केवळ एक व्यक्ति नाहीं. आचार्य अत्रे यांच्यांतला 'प्रल्हाद केशव' हा व्यक्तित्वाचा केवळ वैयक्तिक भाग कधींच संपला आहे, आणि अत्रे हे आतां अवध्या महाराष्ट्राचे धन झाले आहे. महाराष्ट्राच्या शैक्षणिक आणि साहित्यिक जीवनाशीं 'प्रारंभ काळीं' अत्र्यांचा संवंध आला असला तरी त्या लहान जगांत अत्र्यांच्या प्रतिभेचें व व्यक्तित्वांतील अन्य गुणांचें समाधान झालें नाहीं. अत्र्यांनीं जी झेंप घेतली ती त्यांच्या आकार निल्हे व्यक्तित्वाला साजेशी — फार मोठी घेतली व आतां महाराष्ट्र आणि आचार्य यांचें भावजीवन एकरूप झालें आहे. महाराष्ट्राच्या राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक, साहित्यिक, वक्तृत्वविषयक अशा विविध अंगांमध्यें आज त्यांची प्रतिभा कांहीं 'विक्रम' करून दाखविते आहे. अत्रे यांचें वर्णन एकाच शव्दांत कुणीं मला करायला सांगितलें तर मी तें "जागल्या" ह्या एकाच शव्दांत करीन! अत्रे रसिक आहेत, कवि आहेंत, यशस्वी वक्ते आहेत. नाटककार आहेत. पटकथा लेखक-निर्माते-दिग्दर्शक आहेत. शैलीकार निवंध लेखक आहेत, थोर विनोदकार आहेत हें खरें असले तरी ते खरेखुरे 'जागल्ये' आहेत. आणि पारतंत्र्याच्या काळांत जसे ते 'जागल्ये' म्हणून वागले, तसेच गेल्या सोळा सतरा वर्षातही वागले आहेत असें मला वाटते. सामान्य माणसावद्दल त्यांच्या मनांत अमाप कणव आहे. त्यामुळें समाजांतल्या लहानसहान अन्यायांना अत्र्यांनीं वाचा फोडली आहे. त्यांच्या 'पत्रकार' जीवनांत त्यांनीं अनेक चमत्कार करून दाखविले आहेत. त्यांत अन्यायाच्या प्रतिकारार्थ त्यांनीं जेवढें व जेवढचा तिडिकीनें लिहिलें आहे तेवढें कुणी लिहिलें असेलसें वाटत नाहीं. त्यांच्या जीवनाचा सारा पटच आज आपल्यापुढें आहे. त्यांना शिव्या देणारीं, त्यांच्या मतांवद्दल मतभेद व्यक्त करणारीं माणसेंही 'आचार्य अत्रे' ह्या माणसावर पुन्हां प्रेमच करतात. महाराष्ट्रानें प्रेम करावें असाच हा माणूस आहे. आचार्य अत्रे यांनीं अनेक चमत्कार केले आहेत. त्यांचा स्वभाव उत्कट—मनस्वी असा आहे. त्यांतून ते घडले आहेत. नाटककार म्हणून त्यांनीं अलिकडे पुन्हां जी झेंप घेतली आहे तोही एक असाच चमत्कार होय! अनेक श्रेष्ठ गुणांचा समुच्चय म्हणजे आचार्य अत्रे! महाराष्ट्राच्या लढयाचा हा 'जागल्या' आहे. शारदेला पडलेलें तें एक रमणीय व भव्य स्वप्न आहे. महाराष्ट्राचे ते एक मोठें धन आहे. त्यांच्या रसिकतेच्या, उदारतेच्या, धडपडीच्या, साक्षेपी वाचनाच्या कितीतरी गोष्टी सांगतां येतील. महाराष्ट्रानें त्या जपल्या आहेत. जपणार आहे. कारण हा माणूस जपण्यासारखाच आहे. आज रात्र वैऱ्यांची आहे. तेव्हां 'जागल्या'ची आज आत्यंतिक गरज आहे. आज हा 'मराठा' (ठी) जागल्या योग्य ती कामगिरी वजावीत आहे. कलेला वय नसतं, प्रतिमा कधी 'म्हातारी' असत नाहीं. आचार्यांची प्रतिभा पुन्हां पल्लवित वृत्तीनें संचार करूं लागली आहे. वाढा! वाढत रहा! अशीच इच्छा त्यांच्यावद्दल कुणींही सच्चा 'मराठा' व्यक्त करील. मराठी 'दीपावली' त्यांच्यांतील श्रेष्ठ गुणांना अभिवादन करीत आहे. ● ●

## "चिरतरुण" केशवराव

**ज्या** देशांत विद्या, कला, शास्त्रें, यांचा जनसमूह आणि राज्य-शासन यांजकडून उचित गौरव केला जातो, त्यांच्या विकासाला सुयोग्य सहाय्य मिळत जाते त्या देशाची प्रकृति निकोप आहे. त्या देशाचें शासन कांहीं चांगलें घडवूं शकते अशी आशा करायला जागा असते. स्वतंत्र भारतांत ह्या गोष्टींचा गौरव होत आहे. त्यांची 'दिल्ली दरवारीं' दखल घेतली जात आहे. त्यांच्या विकासांना आर्थिक सहाय्य दिलें जात आहे ही गोष्ट मोठी शुभसूचक आहे.

भारताच्या राज्यशासनानें अशाच एका ज्येष्ठ व श्रेष्ठ अशा मराठी कलाकाराचा गौरव केला ! त्या कलाकाराचें नांव आहे "**केशवराव दाते !**" त्यांना सारी मराठी माणसें ओळखतात नटवर्य केशवराव दाते म्हणून ! महाराष्ट्रांत लहान थोरांपासून साऱ्यांनाच नाटकाचें वेड असते – आहे ! नाटक हीं आमची 'प्रकृति' झाली आहे. त्यामुळें इथें गिरणगांव, गिरगांव असा भेद न करतां नाटकें होत असतात. गणपतीलाही 'नाटकें' चालतात आणि 'दुर्गा'ही नाटकांचें स्वागत करते. गोव्याला गेलांत, कोंकणांत गेलांत, शाळेंत गेलांत वा गिरणींत गेलांत—नाटकं भेटणारच तुम्हांला ! नाटकाचें हें वेड आम्हांला कुणा एका व्यक्तीनें लावलें हें म्हणणें खरें नाहीं ! अनेकांचा त्यांत वांटा आहे. मराठी रंगभूमीच्या वैभवकाळीं ज्यांनीं घोर नाटचसाघना केली त्या साऱ्या नटांचें, नाटककारांचें हें ऋण आहे. त्या वैभवशाली कालखंडाचे एक थोर पाईक म्हणून महाराष्ट्र केशवराव दाते यांना ओळखतो. त्या काळांत खरेखुरे 'नटवर्य' झाले. आज अभिनय कमी झाला आहे आणि 'पद्‌व्या' स्वस्त झाल्या आहेत. नाटचगुणांपेक्षां नाटचविषयक 'चर्चा'ना अधिक भाव आला आहे. श्रेष्ठ साघना करावी लागते ही जाणीव कमी होत चालली असून झटपट रंगारी अभिनेते आज लहान मोठ्या क्लवांतून रंगमंचावर धुमाकूळ घालीत आहेत. वैभवाची साधना केली तर वैभवकाल उत्पन्न करतां येतो हें घ्यानीं घ्यायलाच कुणीं तयार नाहीं. केशवरावजींची तपश्चर्या मोठी आहे. कारण ती एका आंचेंतून उत्पन्न आली होती व आजही ती आंच सरलेली नाहीं. आजही ते नवनवीन नाटकांना जातात, नवें काय चालू आहे तें पहातात. नव्यांतल्या चांगल्याचें स्वागत करतात. त्यांच्या निर्मितीला मदत करतात, उपयुक्त सूचना देतात. कलावन्त हा नेहमीं भुकेला असावा लागतो. तसे दाते आजही आहेत. आज दाते ७५ वर्षांचे झाले आहेत ही गोष्ट कुणाला खरीच वाटणार नाहीं. कारण या वयांतही ते "तरुण" उमेदीनें नाटकांच्या प्रेक्षागारांत दिसतात. आणि केशवशास्त्र्याच्या भूमिकेंत रंगमंचावरही फिरतात—दाते यांची कला आजही 'तरुण' आहे. त्यांचा केशवशास्त्री पाहून आलेला एक प्रेक्षक मला म्हणाला, "ह्याला अगदीं जोडयानें मारावा असा संताप मला आला होता." दाते यांच्यांतल्या श्रेष्ठ अभिनय गुणांची ही पावती आहे. त्यांच्यांतला जयंत, मनोहर, अजूनही टवटवीत आहेत हें जाणवतें. शारीरिक प्रतिकूलतेवर मात करूनही किती मोठा अभिनेता होतां येतें याचें उत्तम उदाहरण म्हणजे दाते ! दाते यांचा संगीत अकादमीनें केलेला गौरव वृत्तपत्रांत प्रकट झाल्यावर त्यांचें अभिनंदन करायला गेलों. तेव्हां सहज म्हणून मी त्यांना दोन प्रश्न विचारले. "आपल्या नाटचसाधनेंतील अत्यंत मोठा व समाधानाचा बिंदु कोणता ? ते म्हणाले "कलावंत म्हणून मी सर्वच भूमिकांना सारखे व चांगले मानीत आलों. माझा कधीं मी Type होऊं दिला नाहीं. कारण खऱ्या कलावंतानें हीं वेगवेगळ्या भूमिकांचीं आव्हानें स्वीकारलींच पाहिजेत असें मला वाटतें. त्याशिवाय गुणांचा विकास अशक्य आहे. त्यामुळें भूमिका मिळत गेल्या, त्या त्या मी स्वीकारीत गेलों. "**केशव त्र्यंबक दाते**" ह्या व्यक्तीला मात्र गंभीर, कांहीं तरी पटवणारी ठसविणारी अशी भूमिका आवडते. तो माझा स्वभाव आहे. दुसरा प्रश्न मी त्यांना विचारला तो असा "रंगमंचावर भूमिका वठवितांना स्वत:ला विसरून जाऊन भूमिका करणें शक्य असते का ? एकरूप झाला, तन्मय झाला वगैरे भाषा कितपत खरी आहे ?" ते म्हणाले "काम करतांना त्या त्या भूमिकेशीं तादात्म्य होतों याचा अर्थ असा कीं, ती भूमिका वठवीत असतांना येणारें अंशात्मक तादात्म्य ! अनेक क्षणा क्षणांतून हा एकसंध परिणाम नटाला साधावयाचा असतो. त्या त्या क्षणीं तो ती ती भूमिका जगत असतो. ह्या तादात्म्यता पावलेल्या क्षणांची एक सांखळी असते. त्या क्षणांत नटाला तें तादात्म्य आणावेंच लागते त्या क्षणा क्षणांत मात्र तो ती भूमिका जगत असतो. तें feeling त्याला यावेंच लागते. भातुकलींत लहान मुलें मुरमुऱ्याचा भात, जेवण, लग्न ह्या गोष्टी जगत असतात. तुम्हांला बोलावतात तेव्हांही. त्यांची तीच भूमिका असते. ही निरागसता भूमिकेंत असली पाहिजे. हें जगणें, जाणवणें अभिनेत्याला साघलें पाहिजे." हें शैशव दात्यांनीं जपलें आहे. आणि म्हणूनच थोर कलाकाराजवळ असणारी सौंदर्यवेडी व सौंदर्यवेधी दृष्टि त्यांच्याजवळ आहे. म्हणूनच दाते, पंचाहत्तराव्या वर्षीही तरुण आहेत. त्यांची कलादृष्टि निकोप आहे. कलात्मक प्रकृति ठणठणीत आहे. कलातरुण दात्यांचें अभिनंदन करतांना आम्ही राज्य शासनाचेही अभिनंदन करतो !

— **आदित्य**

---

# साभार पोच

**खडा मारायचा झाला तर** (हास्यचित्र संग्रह)
चित्रकार – वसंत सरवटे, प्रकाशक – मौज प्रकाशन गृह, मुंबई ४, मूल्य–रु. ५–००

**लोकसाहित्य भाषा आणि संस्कृति**
संपादिका – डॉ. कु. सरोजिनी बाबर, प्रकाशक–महाराष्ट्र राज्य, लोकसाहित्य समिति, पुणें, मूल्य–रु. २–००

**सतराव्या शतकांतील गोमंतकी बोली**
लेखक–डॉ. विठ्ठल वा. प्रभूदेसाई, प्रकाशक–मुंबई विश्वविद्यालय, मुंबई, मूल्य–रु. ७–५० पै.

**आसवांचा ठेवा**
कवि–मधुकर केचे, प्रकाशक–महाराष्ट्र प्रकाशन, अमरावती, मूल्य–रु. ४–००

**सम्पादण्या**
संपादक–डॉ. यू. म. पठाण, प्रकाशक–मराठवाडा साहित्य परिषद, औरंगाबाद, मूल्य–रु. १–००

**नवीं क्षितिजे**
लेखक–एक कॉंग्रेस कार्यकर्ता, प्रकाशक–ओरियंट लॉंगमन्स लि. मुंबई, मूल्य–रु. १–००

**थंडीचे दिवस**
लेखक–रमेश मंत्री, प्रकाशक–मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई–४, मूल्य–रु. ४–००

**अद्‌भूत**
लेखिका–सौ. वसुंधरा पटवर्धन, प्रकाशक–वा. ल. पाठक प्रकाशन, मुंबई–४, मूल्य–रु. ४–८०

**प्रतिबिंब**
लेखिका – सौ. वसुंधरा पटवर्धन, प्रकाशक – वा. ल. पाठक प्रकाशन, मुंबई – ४, मूल्य – रु. ३–५० पै.

**जिद्द**
लेखक – यशवंत रांजणकर, प्रकाशक – भारतीय ग्रंथ भवन, मुंबई, मूल्य–रु. २–५० पै.

**रामायण**
लेखक – चक्रवर्ती राजगोपालाचारी, प्रकाशक – भारतीय विद्या भवन, मुंबई, मूल्य – रु. ६–००

**मराठी संतवाङ्मयांतील परमार्थ मार्ग**
लेखक – प्रा. रा. द. रानडे, प्रकाशक – भारतीय विद्या भवन, मुंबई, मूल्य – रु. ५–००

**गुपित**
लेखक – पुरुषोत्तम धाक्रस, प्रकाशक – भारतीय ग्रंथ भवन, मुंबई, मूल्य – रु. ४–००

**गांवरहाटी**
लेखक – वि. म. दांडेकर व म. मा. भागवत, प्रकाशक – ह. वि. मोटे, प्रकाशन, मुंबई, मूल्य – रु. ६–००

• • •






हातीं घेतलेलीं कामें जबाबदारीनं अन् आस्थापूर्वक पार पाडून फावल्या वेळांत सर्व गोष्टींचा रसिकतेनं उपभोग घेणारे

## यशस्वी उद्योगपति

# श्री. लालचंद हिराचंद



**केवळ** भारतांतच नव्हे तर परदेशांतहि एक धडाडीचे यशस्वी कारखानदार असा लौकिक लालचंदांनीं मिळविला आहे. मोटार धंद्यांतले तज्ञ कारखानदार म्हणून त्यांचं कर्तृत्व आपल्याकडे सर्वमान्य आहे. उद्योगधंद्याच्या वाढीनंच आपल्या देशाची भरभराट होईल असा त्यांचा दृढ विश्वास आहे. व्यापार अन् उद्योगधंद्यांतला त्यांचा अनुभव मोठा, कारखानदारींतल्या बारीक सारीक गोष्टींचा त्यांचा व्यासंग चौरस अन् त्यांतल्या खांचाखोचांचे त्यांचं ज्ञान अद्ययावत् नि तपशीलवार. त्यामुळं त्यांच्याकडं सल्लामसलतीसाठीं, मार्गदर्शनासाठीं अन् विविध कामाच्या योजना पक्क्या करण्यासाठीं शिल्पविज्ञांची रीघ लागलेली असते. कुणालाहि भेटण्यास हे तयार. भेटीची वेळ मात्र ठरवावी लागते. वक्तशीरपणांत तर ते रावसाहेब मंडलीकांच्या तोडीचे. भेटींत आपले विचार स्पष्टपणं आडपडदा न ठेवतां सांगतील.

लालचंदांचा जन्म २४ ऑक्टोबर १९०४ रोजीं सोलापूर येथें झाला. वडीलांचं नांव हिराचंद दोशी अन् आईचं सखुबाई. हें घराणें जैन पण त्यांची संस्कृती महाराष्ट्रीय अन् मातृभाषा मराठी. १९२२ सालीं लालचंद सोलापूरच्या नॉर्थकोट हायस्कूलांतून मॅट्रीक झाले. याच काळांत गांधींजींच्या असहकारितेच्या चळवळीकडं ते आकर्षित झाले. तेव्हांपासून त्यांनीं खादी वापरण्याचं व्रत घेतलं अन् आजतागायत तें त्यांनी निष्ठेनं पाळलं आहे.

१९२६ सालीं पुण्याच्या डेक्कन कॉलेजमधून लालचंद बी. ए. झाले. त्या काळांतहि त्यांचा स्वभाव मोठा धाडसी. एकदां धनुर्विद्येचा खेळ करण्यासाठीं एक माणूस आला होता. चष्म्याच्या कडेवर दोन्ही बाजूला रुपये ठेवून तो ते बाणानं सफाईदारपणं उडवित असे. पण त्याचा प्रयोग सिद्धीस नेण्यासाठीं चष्मा डोळ्यांवर ठेवून घेण्यास कुणी पुढें येईना. तेव्हां लालचंद झाले पुढं—त्यांनी डोळ्यांवर चष्मा ठेवला; रुपयेहि ठेवून घेतले अन् हा कठीण प्रयोग नेला सिद्धीस. तरुणपणचा हा निर्भयपणाचा संस्कार त्यांनी अजून टिकवला आहे.

बी. ए. झाल्यावर अर्थशास्त्राच्या पुढील शिक्षणासाठीं लालचंद इंग्लंडला गेले. 'मर्कन्टाईल लॉ' या विषयानं दगा दिल्यानं त्यांना अर्थशास्त्राची पदवी मिळाली नाहीं, तरी नवा अनुभव पदरीं पडला. इंग्लंड, फ्रान्स, स्कॉटलंड, ॲमस्टरडॅम व जर्मनी वगैरे देश तेव्हां ते पाहून आले. युरोपांतल्या औद्योगिक भरभराटीचा त्यांच्या मनावर झालेला परिणाम अन् त्यांचे बंधु वालचंद शेठ यांची उद्योगधंद्यांतली उभारी त्यांना उद्योगधंद्यांत पडण्यास प्रेरक अन् प्रोत्साहक ठरली. स्वदेशांत आल्यावर १९२९ सालीं नाशिक येथील रावळगांव साखर कारखान्यावर वालचंद शेठजींनी त्यांची नेमणूक केली.

त्याकाळीं साखर धंद्याला सरकारचें संरक्षण नव्हतं. पण लालचंदांची जिद्द मोठी. तेथल्या कॅनॉलच्या सहाय्यानं नापिक जमिनींत ऊंस पिकविण्याचा प्रयोग त्यांनीं सुरूं केला. सतत परिश्रमानं त्यांनी १४०० एकरी पीक काढलं. आरंभास साखर मिळायची ९ टक्के. पण पुढं त्यांनी तें प्रमाण ११॥ टक्क्यावर नेलं. साखरेपासनं चॉकलेटस् व टॉफीज काढण्याचा उपक्रमहि त्यांनी सुरूं केला. खडीसाखर काढणें, दुधाची डेअरी वगैरे उद्योग त्यांनी चालूं ठेवले. पण उत्पन्नाच्या अगर किफायतीच्या नांवानं ठणठणाटच होता. उत्पादनापेक्षां अन् फायद्यापेक्षां तोटाच जास्त. तरी देखील त्यांनी केलेली डाळिंबांची लागवड नमुनेदार ठरली. उंसाच्या पानांपासून कागद करण्याचा नवा प्रयोगहि त्यांनीं चालूं ठेवला. शेवटीं त्यांच्या प्रयत्नाला आलं यश ! सरकार झालं जागं अन् मग १९३२ सालीं त्यानं दिलं साखरधंद्याला संरक्षण ! नऊ वर्षांच्या परिश्रमानं लालचंदांनी रावळगांवचा कारखाना नांवारुपाला आणला—सर्व प्रकारचीं संकटं सोसून. १९३६ सालीं (ऑक्टोबर) डेक्कन शुगर टेक्नॉलॉजीस्ट असोसिएशन ही संस्थाहि त्यांनी स्थापली. पन्नास सालपर्यंत तेच तिचे अध्यक्ष होते. साखर धंद्यांत अधिकारी व्यक्ति म्हणून त्यांची गणना होऊं लागली. तो त्यांचा लौकिक आजतागायत टिकून आहे.

रावळगांवचं कार्य चालूं असतां लालचंद १९२९ सालच्या लाहोर कॉंग्रेसला स्वयंसेवक म्हणून हजर होते. उद्योगधंदा सांभाळून राजकारणांतहि ते थोडाबहुत रस घेत. भाऊसाहेब हिऱ्यांशीं ह्याच






अनुक्रमणिका

काळांत त्यांचा स्नेह जडला. १९३७ मध्यें कॉंग्रेसतर्फे ते विधानसभेंत निवडून आले. विधिमंडळांत व्यापारी वर्गाची बाजू त्यांनी उत्तम प्रकारें मांडली. पुढं कॉंग्रेसनं विधिमंडळाचा त्याग केला तेव्हां त्यांचाहि विधिमंडळाशीं असलेला संबंध सुटला. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर स्वराज्यांत, १९५२ सालीं त्यांना राज्यसभेच्या सदस्यत्वाचा बहुमान सहा वर्षें लाभला. ब्रिटिश सरकारचा रोष पत्करून त्यांनी त्या काळांत केलेल्या कॉंग्रेससेवेवरून त्यांच्या देशप्रीतीची कल्पना यावी. राज्यसभेंतली त्यांची भाषणंहि नमुनेदार ठरली.

दुसऱ्या महायुद्धाच्या आधीं, स्वदेशांत एखादा विमानाचा कारखाना काढावा अशी कल्पना वालचंदशेठजींच्या मनांत आली, नि लगलीच त्यांनी त्या कार्याला हात घातला. त्या उद्योगासाठीं लालचंदाचीच निवड झाली. इंग्लंडात असतांना त्यांनी विमान विद्या शिकण्यास प्रारंभ केलाच होता. हिंदुस्थानांत आल्यावर विमान कारखाना काढण्याच्या पुष्कळ दिवस आधीं त्यांनी पायलटचं लायसन्सहि मिळविलं होतं. त्यांचं स्वतःचं विमानहि होतं. त्याची किंमत होती अवघीं चार हजार रुपये. तें 'टेलर कप' विमान होतं. विमानविद्येंत त्यांनी पारंगतता मिळविली याचं कारण म्हणजे त्यांचा जन्मजात धाडसी स्वभाव.

या विमान कारखान्याची धामधूम चाललेली असतांना चाळीस साल उगवलं. कॉंग्रेसनं वैयक्तिक सत्याग्रहाची चळवळ हातीं घेतली होती. लालचंद कॉंग्रेसच्या चळवळीशीं एकरूप झालें असल्यानं, विमान बांधणीच्या कार्याला वाहून घ्यावं कीं, सत्याग्रहांत उडी घ्यावी अशा विचारांनी त्यांच्या मनाची चलबिचल होऊं लागली. तडक ते शंकरराव देवांकडे गेले व त्यांना त्यांनी सर्व हकिगत सांगितली. वैयक्तिक सत्याग्रहाच्या चळवळीचं महत्त्व स्वतःला पटलेल आहे हें सांगत असतांनाच त्यांनी विमानबांधणीच्या कार्याची महतीहि देवांना पटवून दिली. तेव्हां शंकरराव लागलीच म्हणाले, "विमानाचा कारखाना काढणं हेंहि एक राष्ट्रीय कार्यच आहे. तेव्हां तुम्ही त्या कामांतच लक्ष घाला. त्याला माझी अनुमती आहे." अन् मग विमान-कारखान्याची झुंज सुरूं झाली.

हा विमान कारखाना बंगलोरला काढण्यांत आला. त्याचं नांव 'हिंदुस्थान एअर क्रॅफ्ट लिमिटेड.' त्याचे संस्थापक वालचंद तर त्याच्या सर्व योजना कार्यवाहींत आणण्याची जोखीम अन् जबाबदारी लालचंदांच्या शिरावर. 'रेसिडेन्ट डायरेक्टर' या हुद्याखालीं ते सर्व कामें पार पाडीत होते. सरकारची मदतहि या कारखान्याला लाभली होती अन् अमेरिकन तंत्रज्ञांचं सहाय्यहि मिळालं होतं. ठराविक वेळांत बांधकामं पुरी करण्याच्या बाबतींत लालचंदांनी अमेरिकन इंजिनियरांशीं पैजा घेतल्या नि सांगितल्यावरहुकूम कामं उरकून त्या जिंकून दाखविल्या. दि. १२ ऑगस्ट १९४१ रोजीं पहिलं भारतीय विमान तयार झालं, या कारखान्यांत ! वालचंदना अतिशय आनंद झाला तर दिवसरात्र केलेल्या श्रमाचं चीज झालं म्हणून-सुखावले लालचंद ! विमान तयार झालं त्या दिवशीं (१२-८-१९४१) समारंभाची धूम लालचंदांनी उडवून दिली. शंभर सव्वाशें प्रतिष्ठित मंडळी या समारंभास हजर होती. त्यावेळीं केलेल्या भाषणांत लालचंद म्हणाले, "इंजिनखेरीज विमानाला लागणारे सर्व प्रकारचे सुटे भाग आम्ही इथंच तयार करणार. हा कारखाना अमेरिकेतल्या अगर युरोपांतल्या कुठल्याहि कारखान्याच्या तोडीचा आहे. दोन हजार माणसं बांधकामासाठीं तर इतर दोन हजार मंडळी तांत्रिक कामांत खपत आहेत." तेव्हां अवघं सदतीस वय असलेल्या लालचंदजींची ही तडफ कौतुकास्पदच म्हटली पाहिजे. विमान धंद्याच्या या उद्योगांत असतांना २८ सप्टेंबर १९४१ रोजीं ते विमान अपघातांतून सुदैवानें बचावले. स्वतःचे विमान त्यावेळीं ते चालवीत होते. पुढं वालचंदांचा विमान कारखाना सरकारनं ताब्यांत घेतल्यानं विमानविद्येशीं लालचंदांचा संबंध राहिला नसला तरी त्यांचं 'नामपत्र' विमान चिन्हांकित असून त्यांत 'साहसे श्रीः प्रतिवसति' हें सुभाषित कोरलेलं आढळतं. त्यांच्या धाडसी स्वभावाला तें शोभून दिसतं.

विमानधंद्यानंतर साताऱ्याच्या कुपर कारखान्याच्या वाटाघाटींतहि लालचंदांचा हात होता. हा कारखाना साताऱ्याचे सर धनजीशा कुपर ह्यांच्याकडून वालचंदशेठजींनी घेतला व त्यांत जास्त भांडवल घालून त्याचं रूपांतर त्यांनीं लिमिटेड कारखान्यांत केलं. कुपरना पैशाची गरज असल्यानं त्यांनी तो वालचंदांना विकला. या सर्व व्यवहारांत लालचंदांनीच पुढाकार घेतला. या कारखान्यांत मोटारींना लागणारीं इंजिनें बनविण्याचा प्रयत्न करण्यांत आला. ती कल्पनाहि लालचंद यांचीच. या सुमारास वालचंद शेठजींनी मोटारचा कारखाना काढण्याचं ठरविलं. पण तेव्हांचं सरकार मोटार धंद्याला परवानगी देईना. वालचंदांनी इंग्लंडच्या लोकसभेच्या सदस्यांना तारा करून हा प्रश्न धसास लावण्याची कोशीस केली. बऱ्याच प्रयत्नानंतर अखेरीस सरकारचा अडसर दूर झाला अन् मग १९४४ सालीं वालचंदांनीं कुर्ल्याला 'प्रिमियर ऑटोमोबाईल्स लिमिटेड' हा कारखाना काढला. या सर्व योजनेंत व घडामोडींत लालचंद प्रथमपासून होते. या कारखान्याची सर्व जबाबदारी त्यांच्यावरच टाकण्यांत आली अन् मग त्यांच्या जीवनाचं नवं पर्व सुरू झालं.

मोटार कारखान्याच्या सुरुवातीपासून लालचंद कंपनीच्या संचालक मंडळावर होते. वालचंदशेठजींच्या निधनानंतर (१९५३) ते कंपनीचे अध्यक्ष बनले. या कारखान्यासाठीं पहिलं भांडवल होतं सवादोन कोटींचं, पण तें अपुरं पडलं. पाश्चिमात्य कारखान्यांची या धंद्यात जोराची स्पर्धा असल्यामुळं तेव्हांच्या सरकारचें सहाय्य 'प्रिमियर'ला मुळींच नव्हतें. त्यामुळं लालचंदांना अनेक संकटांना तोंड द्यावं लागलं. होतां होतां १९४७ सालीं या कारखान्यांतली पहिली मोटार तयार झाली. १९५३ सालीं स्वराज्यांत, टॅरिफ कमिशन आल्यावर सरकारकडून या धंद्यास संरक्षण मिळत गेल्यानं परिस्थिती पालटत गेली. १९५७ सालीं 'प्रिमियर' मधून ५५००० मोटारी तयार झाल्या तर १९६२ सालीं ही संख्या लाखाच्यावर गेली. पंचावन्न हजारावी मोटार बाहेर पडली तेव्हां तिचं सारथ्य लालचंदांनीच केलं व दि. १६-३-१९६२ रोजीं त्यांनी लाखावी मोटार तेव्हांचे मुख्यमंत्री श्री. यशवंतराव चव्हाण यांच्या अध्यक्षतेखालीं सन्मानपूर्वक बाहेर काढली तीहि स्वतः चालवून. आहे कीं नाहीं हौस नि जिद्द ?

मोटारचे ७५ टक्के भाग याच कारखान्यांत तयार होतात. शंभर टक्के मोटार बनविण्याची मनीषा लालचंद बाळगून आहेत. या कारखान्यासाठीं अमेरिकेडून ७२ लाख डॉलर्सचं (३ कोटी ४० लाख) कर्ज मिळविण्याचा करार दि. २१–८–१९६१ रोजीं दिल्लींत झाला. अमेरिकेच्या 'विकास कर्ज निधी'तून हें कर्ज देण्याचं ठरलं. "प्रिमियर आॅटोमोबाईल्स लिमिटेडच्या इतिहासांतील हा एक संस्मरणीय प्रसंग आहे" असे उद्गार त्यावेळीं लालचंदांनी काढले. हा कारखाना आज जो नांवारूपाला आला त्याचें बरेचसें श्रेय त्यांच्या कर्तबगारीला द्यावयास हवं. त्यांची 'फियाट' आज लोकप्रियतेच्या शिखरावर आहे व तिला आजमितीला जी भरमसाट मागणी आहे त्यावरून वरील विधानाची यथार्थता सहज पटेल. ते स्वत: तंत्रज्ञ नाहींत. पण या धंद्याबाबतचा त्यांचा अभ्यास अन् व्यासंग इतका सखोल आहे कीं तो पाहून शिल्पविज्ञांची मतीहि गुंग व्हावी. जें क्षेत्र स्वीकारायचं त्या क्षेत्राच्या सर्व शाखोपशाखांचा सूक्ष्म अभ्यास करावयाचा ही त्यांची वृत्ति असल्यानं ते त्या क्षेत्रापुरतें अधिकारवाणीनं बोलण्यास कधीं कचरत नाहींत. नुसती संचालकीय जबाबदारी पत्करून स्वस्थ बसणं हा त्यांचा धर्म नाहीं. तर त्या त्या धंद्याविषयीं – कारखान्यासंबंधीं सर्वज्ञ बनण्याचा त्यांचा प्रयत्न असतो.

१९५२ ते १९५७ या काळांत ते राज्यसभेचे सभासद होते. १९५२ सालीं भारतीय शिष्टमंडळाचे नेते म्हणून ते मास्कोला जाऊन आले. अर्थशास्त्रज्ञांची आंतरराष्ट्रीय परिषद तिथं भरली होती. १९५९ सालीं इंडियन मर्चंटस् चेंबरचें अध्यक्षपद त्यांना लाभलं. आॅक्टोबर १९६० मध्यें महाराष्ट्र चेंबर आॅफ कॉमर्सच्या अध्यक्षपदाचीं सूत्रें त्यांच्या हातीं आली. रावळगांव शुगर फार्म, हिंदुस्थान एअर क्रॅफ्ट व प्रिमियर आॅटोमोबाईल्स या तीन कारखान्यांबाबत त्यांनीं बजावलेली कामगिरी महशूर आहे. याखेरीज सातारचा कूपर कारखाना, सिंदिया स्टीम नेव्हिगेशन, इंडियन शुगर मिल्स असोसिएशन, डेक्कन शुगर फॅक्टरीज असो., डेक्कन शुगर टेक्नॉलाजिस्टस् असो. वगैरेशींहि त्यांचा संबंध आहे. याशिवाय असोसिएशन आॅफ इंडियन आॅटोमोबाईल्स मॅन्युफॅक्चरर्स, व महाराष्ट्र इकॉनॉमिक डेव्ह. कौन्सिल यांचे ते अध्यक्ष आहेत. महाराष्ट्र कॉमर्स अॅन्ड रिहॅबिलिटेशन सोसायटीची त्यांनीच स्थापना केली. वालचंद उद्योग समूहांच्या ९ कंपन्यांपैकीं पांच कंपन्यांचे ते संचालक असून, इतर चार कंपन्यांचे ते अध्यक्ष आहेत. औद्योगिक क्षेत्रांतल्या बारीक सारीक बाबींचा सूक्ष्म अभ्यास करण्याची वृत्ति, विविध उद्योगांत अहर्निशपणं काम करीत राहण्याची उपजत आवड, करडी शिस्त अन् संघटना-कौशल्य या सगळ्या गुणांमुळं ते वालचंद उद्योग समूहाचे मोठे आधारस्तंभ समजले जातात.

परखड भाषणं करण्यांत लालचंदशेठ पटाईत. वेळ पडेल तेव्हां विद्यमान राज्यकर्ते व कम्युनिस्ट ह्यांच्यावर ते बिनतोड टीकास्त्र सोडतात. अलीकडे कोंकण परिषदेच्या अध्यक्षपदावरून त्यांनी केलेलें भाषण कसं संस्कृतप्रचुर अन् तिखट आहे. वक्तृत्व हा त्यांच्या कर्तृत्वाचा एक गौरवार्ह पैलू आहे. विशेषत: त्यांनी केलेलीं सहजस्फूर्त भाषणं नमुनेदार ठरलीं. श्री. यशवंतराव चव्हाण दिल्लीला गेले त्यावेळीं महाराष्ट्र चेंबर आॅफ कॉमर्सतर्फें त्यांना निरोप देण्यांत आला असतां, लालचंदांनी आपल्या अध्यक्षीय भाषणांत राजकीय धोरण कसं असावं तें फार मार्मिकपणं सांगितलं. ते म्हणाले, "ज्यावेळीं देशाचे अस्तित्वच धोक्यांत येतें तेव्हां कोरडें तत्त्वज्ञान थोडा वेळ बाजूला ठेवून व्यवहारी धोरण स्वीकारले, पाहिजे. लो. टिळकांनी 'शठं प्रति शाठ्यम्' हा मंत्र आम्हांला दिलेला आहे." एकंदरीत त्यांचं वाचन व्यापक अन् चौरस असल्यानं त्यांची छोटीं भाषणं गुणानं मोठीं ठरतात.

लालचंदांना खेळांची आवड आहे. टेनिस, बॅडमिंगटन व गोल्फ ते अजूनहि खेळतात. तरुणपणीं हुतुतू, क्रिकेट वगैरे खेळ ते खेळले आहेत. क्रिकेटचे कसोटी सामने पहाण्यास अलीकडं ते जात नसले तरी घरीं असतील तेव्हां टेस्ट सामन्यांचं नभोवाणीवरील बातमीं वर्णन ऐकण्यास चुकणार नाहीत. व्यायामाची त्यांना आवड असून तरुणपणीं केलेल्या अंगमेहनतीचा फायदा आजहि उत्तम आरोग्याच्या रूपानें ते उपभोगत आहेत. ते पूर्वी तबला शिकत होते; त्याप्रमाणं फोटोग्राफीचाहि त्यांना छंद होता. नाटक चित्रपटांतहि ते चांगले रमतात. "बालगंधर्व गाण्यामुळं लोकप्रिय झाले कीं अभिनयामुळं ?" असा प्रश्न मी त्यांना गंमतीनं विचारला. तेव्हां "दोघांच्या समन्वयामुळं !" असं चटकन् ते म्हणाले. मराठी-हिंदी चित्रपट इंग्रजी चित्रपटांच्या तोडीचे आहेत पण तांत्रिक कलेंत ते फार थिटे ठरतात असं त्यांना वाटतं. अमेरिकेंत गेले तेव्हां ते मुद्दाम हॉलीवूड पाहून आले. गाण्याची आवडहि त्यांना आहे; पण भावगीत ( Light Music ) गायनांतच ते जास्त रमतात. गहन ग्रंथांपेक्षां वृत्तपत्रें व मराठी–इंग्रजी मासिकें ते आवडीनं वाचतात. त्यांचा ग्रंथसंग्रह छोटासा पण त्यांत महाभारताचे खंड हटकून दिसतात. महाभारत-रामायण ग्रंथांची त्यांना आवड असून फुरसतीच्या वेळीं त्यांतील प्रसंगाच्या कार्यकारण भावांचं चिंतन करण्यांत ते मग्न असतात. 'गणपति' या दैवताविषयींच्या वाङ्मयाचा त्यांचा व्यासंग वाखाणण्यासारखा आहे. 'स्वस्तिक' व 'ॐ' ह्यांच्या व्युत्पत्तींचाहि त्यांचा अभ्यास सखोल आहे. एवंच, कारखान्यांतल्या यंत्रांच्या खडखडाटांत उभी हयात घालविणारे लालचंदशेठ मोठे रसिक आहेत.

लालचंदांनी जगप्रवास केलेला आहे. चीन व दक्षिण अमेरिका सोडून सर्व जगभर त्यांनी संचार केलेला आहे. "जगांत सुखी देश कोणता ?" असं मी त्यांना विचारलं. "इंग्लंडला मानसिक सुख सर्वांत जास्त आढळतं." ते म्हणाले

"आपलं जीवितविषयक तत्त्वज्ञान कोणतं ?" "हातीं घेतलेलं काम आस्थापूर्वक नि जबाबदारीनं पार पाडायचं. पण काम हेंच कांहीं माझ्या जीवनाचं ध्येय नाहीं. काम करून फावल्या वेळीं इतर सर्व गोष्टींचा रसिकतेनं उपभोग घ्यायचा, असं आहे माझ्या जीवनाचं तत्त्वज्ञान" लालचंद म्हणाले.

असे हे विविध क्षेत्रांत कर्तबगारी दाखविणारे शेठ लालचंद येत्या २४ आॅक्टोबरला ६१ व्या वर्षांत पदार्पण करीत आहेत. कल्याणजवळ आणखी एक प्रचंड मोटार कारखाना उठविण्याची हिंमत त्यांनी बांधली आहे. साठी उलटत असली तरी त्यांची अंगकाठी मजबूत आहे, उत्साह तरुणालाः लाजवील असा आहे अन् मन चिरतरुण आहे. आणि म्हणून या प्रसंगीं '६१ वर्षांचे तरुण कारखानदार' असंच त्यांचं वर्णन कुणीहि करील. !!

—अरविंद ताटके

• • •






अनुक्रमणिका



(अभिनेता रिचर्ड बर्टन आणि चित्र तारका सौंदर्यशालिनी आव्हा गार्डनर)




# "दि नाईट ऑफ दि इग्वाना!"

**रंगभूमीवर** आणि रुपेरी पडद्यावर विजयश्री ज्यांच्या गळयांत मोठ्या डौलानें माळ घालते अशा भाग्यवान साहित्यिकांत 'टेनेसी वुइल्यिअम्स' या सुप्रसिद्ध नाटककाराची गणना प्रामुख्यानें करण्यांत येत असते. त्यानें लिहिलेलीं नाटकें रंगभूमीवर जशीं लोकप्रिय ठरलीं आहेत तद्वतच त्या नाटकांवरतीं आधारलेले चित्रपटसुद्धां तुफान यशस्वी झालेले आहेत !

'स्ट्रीटकार नेमड् डिझायर', 'रोज टॅटयू', 'कॅट ऑन हॉट् टिन रूफ' आणि 'पिरीअड ऑफ अॅड्जस्टमेंट' हे प्रख्यात चित्रपट रुपेरी पडद्यावर खूप गाजले इतकेंच नव्हे, तर अगोदर तीं नाटकेंहि रंगमंचावर गाजून गेलीं होतीं.

'दि नाईट ऑफ दि इग्वाना' हें त्याचें अलिकडचें नाटक आतां चित्ररूपानें प्रकट होत असून चित्ररसिकांना या चित्राबद्दल उत्कंठा वाटणें हें स्वाभाविकच आहे. न्यूयॉर्कच्या नाटचसमीक्षक मंडळानें या नाटकाला 'पहिल्या अनुक्रमाचें पारितोपिक' बहाल केलें आहे आणि प्रयोगदृष्टयासुद्धां या नाटकानें भरपूर प्रसिद्धी आणि लोकप्रियता मिळविलेली आहे.

'ट्रेझर ऑफ सिरेरा माद्रे', 'की लार्गो', 'मिस्फिटस्', अशा नामांकित चित्रपटांचे दिग्दर्शक जॉन हस्टन या मातबर कलाकारानें प्रस्तुतचा चित्रपट दिग्दर्शित केला हा एक अपूर्व योग म्हटला पाहिजे. सर्वोत्कृष्ट दिग्दर्शनाबद्दल त्यांनीं १९४८ सालीं ऑस्कर पारितोषिक पटकाविण्याचा मान मिळविला आहे. रिचर्ड बर्टन्, आव्हा गार्डनर, डेबोरा कर, सु लिऑन अशा अग्रगण्य कलावंतांच्या भावपूर्ण आणि मनोरम भूमिकांचें दर्शन आपणांस या चित्रांत घडणार असून मेक्सिकोमधील नयनरम्य निसर्ग हें या चित्राचें एक महत्त्वाचें अंग ठरलें आहे. निसर्गाचीं सौंदर्य स्थळें टिपण्यासाठीं दिग्दर्शक हस्टन आपल्या कलावंत आणि तंत्रज्ञ मंडळाच्या मेळाव्यासह साऱ्या मेक्सिको देशभर अनेक दिवस फिरत होते.

शॅनॉन या टूरिस्ट गाईडच्या भूमिकेंत चित्रतारा रिचर्ड बर्टन् हॉटेलची एक चंट मालकीण म्हणून सौंदर्यशालिनी आव्हा गार्डनर, शिक्षकिणींच्या मेळाव्यामधील सू लिऑन ही भोळशा तरुणी आणि निराश्रित जीवन कंठीत वणवण फिरणारी कविकन्या 'हॅना' बनून चित्रतारका डेबोरा कर, हा सारा नटसंच, आपल्या असामान्य अभिनय नैपुण्यानें कथेमधील समर प्रसंगामध्यें मोठ्या बहारीचा उठाव आणतात.



सुप्रसिद्ध नाटककार टेनेसी वुइल्यिअम्स 'नाईट ऑफ दि इग्वाना' या चित्रपटांत चमकणाऱ्या सू लिऑन या चित्रतारकेबरोबर....

रे स्टार्क हे या चित्रपटाचे निर्माते आहेत. 'वर्ल्ड ऑफ सूझी वॉंग', 'लोलिता', व्हॉटएव्हर हॅपन्ड टु बेबी जेन' हीं त्यांनीं निर्माण केलेलीं आणि आपल्याकडे बॉक्स ऑफीसचें एक प्रभावी आकर्षण ठरलेलीं चित्रें प्रेक्षकांच्या दीर्घ काळ स्मरणांत रहातील.

'दि नाईट ऑफ दि इग्वाना' हा चित्रपट मेट्रो चित्रगृहामध्यें या महिन्यांत दाखल झालें आहे ही बातमी चित्ररसिकांना कळवितांना मला फार आनन्द होत आहे.

**–चित्तचकोर**

(पान १० वरून)

प्रश्न – तुमच्या कथांच्या निवेदन शैलींत कांहीं Cinematic effect येतो तो कसा काय ?

गोखले – तो येतो कारण मला नुसता प्रसंग दिसत नाहीं. नाटकाच्या वा सिनेमाच्या Art Director प्रमाणें मला सर्व सेट मांडावा लागतो. clear चित्र समोर लागते. "विघ्नहर्ती" कथेचंच बघा ना. तो जिना, तीं गच्चीवरची खोली सारं मला प्रथम वांचावं लागलं. मी 'फ़िल्म क्रॅफ्ट'चा बराच अभ्यास केला आहे. त्याचा परिणाम माझ्या लेखनावर झाला आहे.

प्रश्न – सिनेमाच्या क्षेत्रांतला जो अनुभव आला तो कसा काय आहे ?

गोखले – फारसा चांगला नाहीं. मला ज्या कथा आवडल्या त्या अजून घेतल्या गेल्या नाहींत. ज्या विशेष आवडल्या नव्हत्या त्याच घेतल्या जातात आणि मग मीही मरतो व निर्माताही मरतो. माझ्या चांगल्या कथेचा चांगला चित्रपट तसा अजून निघालेला नाहीं. अपवाद फक्त 'अविधवा' ह्या कथेचा आहे.

प्रश्न – आपल्या कोणत्या कथांवर चित्रपट निघूं शकेल असें वाटते ?

गोखले – शपथ, अर्घ्य, बापू आणि बनू, उभा जन्म उन्हांत, सोहनची आई, वारस ह्या कथांतून चित्रपटांची कथानकें होऊं शकतील. सध्यां 'शपथ' कथेचा एक चित्रपट निघण्याची शक्यता आहे.

प्रश्न – आपल्या कांहीं फसलेल्या कथांचें पुनर्लेखन करणार आहांत काय?

गोखले – माझ्या मतें फसलेली कथाच नसते. कांहीं कथांत दोष असतील. तरी पण ती फसलेली कथा नसते. पांच सहा कथा अशा निघतील. पण त्या पुन्हां लिहिणें आतां जमणार नाहीं. फसलेली कथा ही तडा गेलेल्या अब्रूसारखी असते. ती पुन्हां कशी सांधायची ?

प्रश्न – आपल्या कथांत व्यक्तिचित्रें अशीं फारशीं असत नाहींत ह्याचें कारण सांगाल काय ?

गोखले – संपूर्ण व्यक्तींत माझा Interest टिकत नाहीं. त्यांच्या जीवनांतला महत्वाचा व उजळून टाकणारा प्रसंग हातीं आला कीं मला पुरेसें होते. एकादा सूर, लकब, नुसते डोळे, संवादाचा तुकडा येवढेच आकर्षण मला पुरते. त्यामुळें मला भेटलेल्या व्यक्तीच्या संपूर्ण अंतरंगांत शिरण्याचा मी प्रयत्न करीत नाहीं.

प्रश्न — असाधारण प्रसंग व Abnormal व्यक्तींवर तुमच्या कथा आधारित असतात असें कांहीं टीकाकारांचें मत आहे. तुम्हांला काय म्हणायचें आहे यावर ?

गोखले – असामान्य, असाधारण वाटणार नाहींत अशा प्रसंगावरच्या कथाही मी खूप लिहिल्या आहेत आणि ज्याला असाधारण म्हटले जाते तसे ते नसतातच ! आपले वाचक व लेखकही एका ठराविक चाकोरींतल्या जीवनांतून जात असतो म्हणून त्याला तसल्या कथांत Abnormality दिसते. आपल्या जीवनांतच तशी फारशी Variety नाहीं. आपण पूर्ण किडलेलोहि नाहीं. आणि विविधतेचाहि आपल्यांत अभाव आहे. लहान माणसांच्या जीवनांतले उजळणारे प्रसंग समाजाला गति–प्रेरणा देऊं शकतात असें मला वाटते. संसाराची वाटचाल अखेर अशा तथाकथित अकल्पित, भडक, चमत्कृतिपूर्ण घटनांवरच सुरू असते.

प्रश्न – आपल्या 'अनामिका' ह्या कथासंग्रहानें जसें वाचकांचें लक्ष वेधून घेतलें तसेंच टीकाकारांचेंही ! छंद, आलोचना, साधना, प्रतिष्ठान सारख्या नियतकालिकांतून त्यावर बरीच टीकाही झाली–त्या टीकेच्या संदर्भात आपली भूमिका काय आहे ?

गोखले– खरं म्हणजे त्या कथा लिहितांना एका वेगळ्या जीवनाचा मी पाहिलेला आलेख वाचकांना सादर करावा येवढीच माझी भूमिका होती. आपण वेगवेगळ्या कथा वेगवेगळ्या तंत्रानें लिहितों. तशाच त्या संग्रहांतील कथाही वेगळ्या तंत्रानें लिहिल्या आहेत. त्यांतलीं 'उध्वस्त' ही कथा Imaginative आहे. टाइम्समधील एका पत्राच्या अनुषंगानें मला ती स्फुरली. 'कुमुदी' हें एक तिघां व्यक्तींचें Combination आहे. अनामिकेंत आलेला मानवी जीवनाचा भाग कांहीं एका कामगिरीवर असतांना मला पहाण्याची संधि मिळाली. मला तो भाग Dark, ओंगळ असा वाटला नाहीं. त्याचें चित्रण सादर करावेसें वाटलें. त्यांतलें जीवनदर्शन अस्सल होतें. पांढरपेशा भाग हा माझ्या वृत्तीचा अविभाज्य भाग आहे. ज्या तऱ्हेनें आयुष्य पाहिलें तसें मांडलें. वेश्यांवर आधारित कितीतरी माणसें त्या वस्तींत असतात. "जागरण" ह्या गोष्टींत त्याचें चित्रण आलें आहे. मूळ भूमिका जी गृहित धरली तसेंच चित्रण केलें आहे. फार मोठा Stand मी घेतलाच नव्हता.

प्रश्न – कथेचा मूळ आराखडा कधीं लिहिण्याच्या ओघांत बदलतो का?

गोखले – तपशीलामुळें मूळ आराखडा कधीं बदलला नाहीं. कथा सुचली कीं मी आधीं कुणाला तरी सांगतो. म्हणजे तपशील व बारकावे वगैरे चटकन ध्यानीं येतात.

प्रश्न – मग लिहून झालेल्या कथेचा पहिला वाचक कोण ?

गोखले – मासिकाचे संपादक ! मी सुद्धां स्वतः परत त्या वाचत नाहीं. मला वाचवत नाहीं.

प्रश्न – मराठींतल्या टीकाकारांचा आपल्याला लेखनाच्या विकासाचे दृष्टीनें कितपत फायदा झाला ?





गोखले – टीकाकारांचा लेखनाच्या विकासाचे दृष्टीनें कांहीं फारसा फायदा झाला नाहीं. खांडेकरांच्या लेखानें प्रसिद्धि मिळाली, परंतु एकूण तसा फायदा झाला नाहीं.

प्रश्न – लेखनाची धुंदी कधीं चढते ? धुंदीतल्या कथा निःसंशय चांगल्या होत असतील !

गोखले – कल्पना सुचते व ती घोळवीत राहतो तेव्हां मी धुंदीत असतो एकदम मला fresh वाटूं लागतें.

प्रश्न – मंजुळा, रिक्ता, कॅक्टस ह्या कथांची कुळकथा सांगा.

गोखले – मंजुळा ही प्रत्यक्ष परिचयांतली स्त्री आहे. ती आली. सांसारिक दुःख तिनें मला वारंवार सांगितलें. तिचें तिच्या नवऱ्यावर प्रेम होतें. पण ती दुःखी होती. पण तिचें सांगणें मी कधीं Seriously घेतलें नाहीं. पुन्हां पुन्हां ती येऊन सांगे. दोन वर्षं ती सांगतच राहिली. पण मग अखेर तिनें स्पष्ट शब्दांत व्यथा मांडली. आणि कथेला आकार आला. तिला Sympathy व Solution नको होतें. मी तिचा फार अंत पाहिला. रिक्ता ही मुलगी – वाई अशीच आमच्या पाहण्यांतली. चांगल्या परिचयाची आहे. कलंदर नवरा व पैशांच्या व मुलांच्या काळजीनें गांजलेली वाई माझ्या पाहण्यांत आली व ती 'रिक्ता' आहे हेंच सारखें जाणवत गेले. **'कॅक्टस्'** ही कथा पुष्कळांना 'परकी' वाटली. परंतु पुण्यांत असे दोन पितापुत्र मी पाहिले आहेत. दोन जीवन चित्रें मी एकत्र केलीं व कॅक्टस् ही कथा झाली.

प्रश्न — नवकथेच्या संदर्भात आपलें नांव नेहमीं घेतलें जातें. कांहीं टीकाकार आतां मात्र माडगुळकरांप्रमाणेंच आपलाही उल्लेख नवकथाकार म्हणून करण्याचे टाळतात. फक्त गाडगीळ व सदानंद रेगे, जी. ए. कुलकर्णी वगैरे मंडळीच त्यांत बसतात असें त्यांना वाटतें. आपली नवकथेबद्दलची भूमिका सांगाल?

गोखले – सोय म्हणून नवकथा हा शब्द आला असें मला वाटतें. १९४७-४८ चें सुमारास हें वारें आले. आम्हां चार जणांचा उल्लेख केला जातो तें बरोबर नाहीं. बी. रघुनाथ, मोकाशी, रेगे ह्या मंडळींचा उल्लेख व्हायला हवा. ह्याला पंथ म्हणतां येत नाहीं. त्या लेखनाचा स्वभाव वेगळा होता. सूचकता, संयम व सूक्ष्मता त्यांत होती. ती अंतर्मुख कथा होती. तिला विषयांचें, तंत्राचें बंधन नव्हते. परिणाम साधायची हांव तिला नव्हती. पण त्याही कथेला एक परंपरा होती असें मला वाटतें. चोरघडे, कुसुमावती यांच्या त्यापूर्वीच्या लेखनांत ती प्रगट झाली होती. तसेंच R.W.D. जी. एन्. आपटे, ग. रा. वाळ, दिवाकर कृष्ण यांच्याही कथांतून नवकथेचीं पदचिन्हें दिसतात. पण नवकथा म्हणजे अगदीं कोरडेपणानें लिहिणें हीच व्याख्या असेल तर त्यांत आम्ही कुणींच बसत नाहीं हें खरें आहे. नवकथा ह्या विषयावर व्यापक भूमिका घेतली पाहिजे असें वाटते.

प्रश्न – लेखकांच्या आयुष्यावर आपण कांहीं कथा लिहीत आहांत असं आपण परवां सहज बोलतांना म्हणालांत. त्याबद्दल अनुभव काय येतो ?

गोखले – लिहीत आहे. पण त्याला इतक्या मर्यादा पडतात हें जाणवतें. राजकारण, संगीत, क्रिकेट, प्रोफेसरकी ह्या पलिकडे आमच्या लेखकांचें जगच दिसत नाहीं. जीवनांत विविध थरांतले अनुभव घेण्याची, ते लोकांपुढें मांडण्याची तयारी हवी. आमच्यांतला एखादा माडगुळकर शिकारीला जातो आणि आम्ही त्याचें कौतुक करतों. आपल्या लेखनाला त्यामुळेंच मर्यादा पडतात. दोन तीन कादंबऱ्यांत आमचे लेखक संपतात. त्यामुळें मी ह्या कथा लिहितांना पुष्कळदां अडतो.

प्रश्न – **अभ्यासानें व मार्गदर्शनानें लेखक होणें शक्य आहे काय ?**

गोखले – अभ्यासानें व मार्गदर्शनानें आपलें लेखन सुधारेल हें खरेंच ! पण मला वाटतं, प्रतिभेचें देणें देवाचें असतें ! लेखक जन्मावाच लागतो. तसंच हल्लीं वाटतं तितकं लेखकाचं लेखक म्हणून जिणं सुखाचं नसतं. कलानिर्मितीसाठीं त्याला फार मोठं मोल द्यावं लागतं. मनावर सतत दडपण असतं. Nervous Strain पडतो. आपलं लेखन अमर व्हावयाचं असेल तर त्याला वारंवार जननमरणाचा सोहळा भोगावा लागतो.

प्रश्न – गोखले साहेब, आतां शेवटचा प्रश्न ! आपण वार्षिक कथासंग्रहाचें संपादन, तसेंच चोरघडे, माडगुळकर वगैरेंचे कथा संग्रह या मागची आपली भूमिका कोणती ?

गोखले – आपण जें माध्यम वापरतो. जें माध्यम आपल्याला फार मोठें मानसिक समाधान देऊन जातें त्याचें आपण कांहीं तरी देणं लागतो अशी माझी भूमिका होती. दरवर्षी चांगल्या कथा वाचकांना देण्याची कल्पना त्यांतून आली. चांगली कथा वाचली कीं, मी अतिशय आनंदित होतों. जणुं मीच ती लिहिली आहे असा आनंद मला होतो. **कथा-लेखक मंडळही** त्याच भूमिकेनें चालविले. आतां १०० वर्षांची मराठी कथा पांच भागांत सादर करणार आहे. शिवाय चांगल्या मराठी कथांचे संग्रह गुजराथी, हिंदी वाचकांना सादर करणार आहे. ह्या देण्यांत मानसिक समाधानही आहे आणि 'कथेचे देणें' फेडून टाकल्याचा आत्मिक आनंदही आहे. • • •

अनुक्रमणिका

